# सुबोधसार.

भाग पहिला.

हा ग्रंथ

अनेक सुभाषित ग्रंथांचे आधारानें

**रंगनाथ सखाराम लाळे किकवीकर,**

तालुके पुरंदर, जिल्हा पुणें;

ह्यांनीं तयार केला;

**तो**

**बाळाजी सखाराम लाळे किकवीकर,**

ह्यांनीं






**मुंबई येथें**

"नेटिव् ओपिनियन्" छापखान्यांत छापिला.

**आवृत्ति पहिली.**

माहे अधिक अश्विन

शालिवाहन शके १८०१ प्रमाथिनाम संवत्सरे.

सन १८७९ इसवी.

**किंमत दहा आणे.**

पृष्ठ २।३।६६ { पृष्ठ २। }

# प्रस्तावना.

सुभाषित हा विषय अतिउत्तम व मनोरंजक असून समय विशेषीं कोणाशीं कसें बोलावें व वागावें वगैरे अनेक विषयांचें सार यापासून समजण्यासारखें आहे, असें जाणून महाभारतादि महान महान ग्रंथांतून राजनीति सांगितली आहे ती, व दुसरे सुभाषित रत्नाकरादि ग्रंथ अवलोकनांत आणून त्यांतील बोधक, दृष्टांतिक, आणि विशेषेंकरून नीतिपर, असे जे उपयुक्त श्लोक दिसले, तेवढेच घेऊन हा सुबोधसार नांवाचा ग्रंथ तयार केला आहे. प्रथमतः श्लोक न घेतां फक्त वाक्येंच घेऊन ग्रंथ करण्याचा विचार होता; परंतु श्लोकाशिवाय नुस्ता अर्थ घेणें तो केवळ पुस्तकी विद्येप्रमाणें जाणावा. कारण अर्थ जरी पठण केला तरी त्याचा वेळेवर दृष्टांत देण्यास कांहींच उपयोग होत नाहीं, व नुस्त्या प्राकृत वाक्याचें विद्वज्जन प्रमाणहि धरीत नाहींत, ह्मणून त्याची योजना अशी केली आहे कीं, प्रथम श्लोक त्याचे खालीं अर्थ व त्याचे खालीं एकंदर श्लोकाचें व अर्थाचें खुलासेवार तात्पर्य आणि बहुतकरून सर्व श्लोक सर्वज्ञातीस व धर्मांस समसमान लागू पडण्यासारखे असून अनुभवसिद्ध असे आहेत. अशा ग्रंथाच्या अवलोकनानें बहुतेक विषयांची चांगली माहिती होऊन सामान्य पुरुषासहि व्यवहारांत कसें बोलावें व वागावें वगैरे अनेक प्रकारचें ज्ञान होण्यासारखें आहे, यांत संशय नाहीं. याचे भाग तीन केले आहेत. सांप्रत पहिला भाग छापून प्रसिद्ध केला आहे, दुसरा व तिसरा भाग तयार करून ठेविला आहे. परंतु सवडी सवडीनें जसजसा आश्रय मिळेल तसतसा अनुक्रमें लौकरच छापविण्याचा विचार आहे. पाहिल्याभागापेक्षां दुसऱ्या भागांत विशेष चातुर्यता व त्यापेक्षां तिसऱ्यांत तर फारच उत्तम योजना झाली आहे. यांत नजर चुकीनें कोठें कोठें अर्थ विपर्यास अथवा दुसऱ्या चुक्या राहिल्या असतील त्या विषयीं विद्वज्जनांनीं क्षमा करून गुण ग्रहण करावेत अशी आमची त्यांस विनयपूर्वक प्रार्थना आहे.

हा ग्रंथ तयार करण्याचे कामांत वे. रा. इच्छाराम पुरुषोत्तम, नागराज पौराणिक वरणगांवकर व रा. रा. बापूजी गोविंद पारखे यांनीं मजला चांगलें साह्य केलें त्याजबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

रंगनाथ सखाराम.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | ३ | तें | तो | ४३ | २१ | असत | असतें |
| ६ | ३ | तशाच | तशीच | ४८ | १ | गुह्य | गुह्यं |
| ७ | १२ | नये, | नये. | ४८ | ८ | कौतुकें | कौतुकं |
| ८ | २ | माशानानीं | माशानानें | ४९ | २६ | सुता | सुतः |
| ९ | ५ | आधक | अधिक | ४९ | २७ | जावई | जावाई |
| ९ | ८ | दुःख | दुःख | ५० | ८ | मथ्र्यमानो | मथ्यमान |
| १० | ६ | शोडशे | षोडशे | ५० | १० | त्याचें | त्याचें |
| १० | ६ | बर्षें | वर्षें | ५० | ११ | त्यापासून | त्यापासून |
| १० | २३ | नियोज्याः | नियोज्या | ५० | १६ | पुष्यमाला | पुष्पमाला |
| ११ | ७ | यक्र | वक्र | ५३ | ११ | अशक्त | असक्त |
| ११ | १६ | याहून | त्याहून | ५५ | २५ | स्तिंवा | स्थितंवा |
| १७ | २४ | दुखं | दुःखं | ५६ | १२ | मीक्ष्णं | भीक्ष्णं |
| १९ | २७ | शत्रला | शत्रूला | ५६ | १५ | त्व्रनर्था | त्वनर्था |
| २२ | २४ | दुमिळ | दुर्मिळ | ६३ | १६ | कधन | कथनं |
| २३ | २४ | हिमाल्यावर | हिमालयावर | ६४ | १८ | पृथ्वो | पृथ्वी |
| २५ | ७ | सर्वभुतीं | सर्वांभुतीं | ६७ | १४ | तेजस्व्यास | तेजस्व्यास |
| २७ | १५ | भरंवसा | भरवसा | ६७ | १८ | यद्यास्तिकि | यद्यास्तिकि |
| ३० | ३ | क्षुधार्थ | क्षुधार्त | ७२ | २६ | होतात. | होतो |
| ३३ | ६ | पतिवृतेचा, | पतिव्रतेचा, | ७४ | ५ | अधर्मातें | अधर्मानें |
| ४३ | ४ | काष्टानीं | काष्ठांनीं | ७५ | २१ | कारान | कारान् |
| ४३ | १७ | नृप | नृप | | | | |

# सुबोधसार.

## भाग पहिला.

### मंगलाचरण.

श्लोक.

नमामिपदपंकजं तवविनायकश्रीयुतं ॥
नकिंचिदपिसिध्यते तवकृपाकटाक्षंविना ॥
मयाविरचितंजग द्धितचिकीर्षुणापुस्तकं ॥
तनोतुगुणिनांमुदं खलुसुबोधसाराभिदं ॥
पुराकृतैःकवींद्राणां पद्यैस्तुजनतुष्टये ॥
रंगनाथेनरचितं बोधसाराख्यपुस्तकं ॥

श्लोक ( अनुष्टुप्छंद ).

भाषासुमुख्यामधुरा दिव्यागीर्वाणभारती ॥
तस्माद्धिकाव्यंमधुरं तस्मादपिसुभाषितं ॥ १ ॥

**अर्थ.**—संपूर्ण भाषांमध्यें श्रेष्ठ, गोड आणि सुशोभित अशी संस्कृत भाषा होय, त्यामध्येंहि काव्यरूप गोड, आणि त्यामध्येंहि सुभाषित श्रेष्ठ होय. **तात्पर्य.**—सुभाषित हें सर्व भाषेमध्यें श्रेष्ठ जाणावें.

गुणाःसर्वत्रपूज्यंते पितृवंशोनिरर्थकः ॥
वसुदेवंपरित्यज्य वासुदेवंनमेज्जनः ॥ २ ॥

**अर्थ.**—गुण सर्वत्र पूज्य होतात, आणि पितृवंश केवळ निरर्थक आहे, यास दृष्टांत असा कीं, लोक वसुदेवाचा त्याग करून श्री कृष्णास नमस्कार करितात. **तात्पर्य.**—गुणवान जगांत पूज्य असतात.

गुणवज्जनसंसर्गा यातिसर्वोपिगौरवं ॥
पुष्पमालाप्रसंगेन सूत्रंशिरसिधार्यते ॥ ३ ॥

**अर्थ.**—सर्वहि वस्तु गुणवंत जनांच्या संबंधानें मोठेपणास प्रा होतात, यास दृष्टांत असा कीं, पुष्प मालेच्या प्रसंगामुळें लोक मस्तकाव सूत धारण करितात. **तात्पर्य.**—सुसंगतीनें प्रतिष्ठा वाढते.

नस्थातव्यंनगंतव्यं क्षणमप्यधमैःसह ॥
पयोपिशौंडिनीहस्ते मदिरांमन्यतेजनः ॥ ४ ॥

**अर्थ.**—अधमजनांजवळ क्षणमात्रहि उभें राहूं नये, व गमनहि क नये; कारण मद्य विक्रय करणाऱ्या स्त्रीच्या हस्तांत दूध असलें तरी मद्यच आहे असें लोक मानितात असें संगति महात्म्य आ **तात्पर्य.**—निच्याचे संगतीनें लघुत्व प्राप्त होतें.

सद्विद्यायदिकाचिंता वराकोदरपूरणे ॥
शुकोप्यशनमाप्नोति हरेरामइतिब्रुवन् ॥ ५ ॥

**अर्थ.**—जर उत्तम विद्या असली तर क्षुद्र उदर भरण्याची चिं काय आहे ? कारण हरेराम असें बोलणारा राघुहि भोजन पावते **तात्पर्य.**—कोणतीहि एखादी चांगली विद्या असली ह्मणजे निर्वाह होण्य कांहीं कठीण पडत नाहीं. विद्येशिवायहि निर्वाह होतो, परंतु प पशुप्रमाणें कावाडकष्ट अथवा गुलामगिरी करावी लागते.

कामधेनुगुणाविद्या अकालेफलदायिनी ॥
प्रवासेमातृसदृशी विद्यागुप्तंधनंस्मृतं ॥ ६ ॥

**अर्थ.**—विद्येचे गुण कामधेनु सारखे आहेत, विद्या अकस्मात् फळ देते, प्रवासीं विद्या मातेसारखी पोषण करिते; तस्मात् विद्या गुप्त ध होय. **तात्पर्य.**—विद्या ही सर्व काल पोषण करणारी होय.

विद्वान्प्रशस्यतेलोके विद्वान्सर्वत्रगौरवम् ॥
विद्ययालभतेसर्वं विद्यासर्वत्रपूज्यते ॥ ७ ॥

**अर्थ.**—विद्वान सर्वत्र लोकांमध्यें प्रशंसेते पावतो, आणि जनांत म त्वहि पावतो, विद्येनें ज्या दुर्लभवस्तु त्या सुलभ होतात. तस्मात् विद्या सर्वत्र पूज्य होय. **तात्पर्य.**—विद्वानासारखी दुसऱ्याची प्रतिष्ठा होत ना

किंकुलेनविशालेन विद्याहीनेनदेहिनाम् ॥
दुष्कुलीनोपिविद्वान्हि देवैरपिसुपूज्यते ॥ ८ ॥

**अर्थ.**—मनुष्याचें कुल जरी बहुत विस्तीर्ण आहे, तथापि जर तें विद्याहीन आहे, तर त्याचा कांहीं उपयोग नाहीं. दुष्टकुलांतील असतांहि जर तो विद्वान आहे, तर त्याची पूजा देवहि करितात. **तात्पर्य.**—विद्वान सर्वत्रांस पूज्य होय.

सर्वद्रव्येषुविद्यैव द्रव्यमाहुरनुत्तमं ॥
अहार्यत्वादनर्घ्यत्वा दक्षयत्वाच्चसर्वदा ॥ ९ ॥

**अर्थ.**—सर्व द्रव्यांत विद्या हें श्रेष्ठ धन आहे असें ह्मणतात; कारण विद्या कोणासहि हरण करितां येत नाहींहि अमोल्य. व: सर्वदा नाश रहित आहे. **तात्पर्य.**—विद्याधन हें श्रेष्ठ होय.

उद्यमेनहिसिध्यंति कार्याणिनमनोरथैः ॥
नहिसुप्तस्यसिंहस्य प्रविशंतिमुखेमृगाः ॥ १० ॥

**अर्थ.**—सर्व कार्यें उद्योगानेंच सिद्ध होतात, केवळ मनोरथानें सिद्ध होत नाहींत. यास दृष्टांत असा की, निद्रिस्त सिंव्हाच्या मुखांत मृग स्वतः येऊन प्रवेश करीत नाहींत. **तात्पर्य**—बहुत करून उद्योगाशिवाय फलप्राप्ती होत नाहीं.

उद्योगिनःकरालंबं करोतिकमलालया ॥
अनुद्योगिकरालंबं करोतिकमलाग्रजा ॥ ११ ॥

**अर्थ.**—लक्ष्मी उद्योगी पुरुषाच्या हस्तास आश्रय देते; आणि अव-दसा निरुद्योगि पुरुषाचा हात धरिते. **तात्पर्य.**—निरुद्योगि दरिद्री असतात.

आलस्योहिमनुष्याणां शरीरस्थोमहान्रिपुः ॥
नास्त्युद्यमसमोबंधुः कृत्वायंनावसीदति ॥ १२ ॥

**अर्थ.**—आळसरूप महान् शत्रु मनुष्यांच्या शरिरांत राहणारा आहे, आणि मनुष्यांस उद्योगासारखा अन्य बंधु नाहीं; कारण उद्योग केला असतां पुरुष खेद पावत नाहीं. **तात्पर्य.**—आळस हा शत्रुवत् घातक जाणावा.

नदैवमितिसंचित्य त्यजेदुद्योगमात्मनः ॥

अनुद्यमेनकस्तैलं तिलेभ्यःप्राप्तुमिच्छति ॥ १३ ॥

**अर्थ.**—दैवानें माझें कार्य होईल असें चिंतन करून पुरुषानें आपल्या कर्तव्य उद्योगाचा त्याग करूं नये; कारण उद्योग केल्यावांचून तिळांतील तेल प्राप्त होण्यासाठीं कोण इच्छा करील? **तात्पर्य.**—प्राक्तनांत असलेलेंहि प्रायः प्रयत्नावांचून प्राप्त होत नाहीं.

प्रायेणधनिनामेव धनलोभोनिरंतरं ॥
पश्चकोटिद्वयोपेतं लक्षंप्रार्थयतेधनुः ॥ १४ ॥

**अर्थ.**—धनिक लोकांसच प्रायः निरंतर धन लोभ असतो. यास दृष्टांत असा कीं, जें धनुष्य दोन कोटींनीं संपन्न असतें तथापि तें लक्षाविषयीं प्रार्थना करतें. **तात्पर्य.**—ज्याचे पाशीं थोडें बहुत द्रव्य असतें त्यासच प्रायः निरंतर धन लोभ असतो.

यस्यार्थास्तस्यमित्राणि यस्यार्थास्तस्यबांधवाः ॥
यस्यार्थःसपुमान् लोके यस्यार्थःसचपंडितः ॥ १५ ॥

**अर्थ.**—ज्याच्या जवळ द्रव्य आहे त्याला मित्र बहुत मिळतात, तसेंच बांधवहि त्याला अनुकूल होतात, तोच पुरुष लोकांत ख्यातिमान् होतो व जनांमध्यें मोठा पंडित म्हणजे ज्ञानी अशी प्रसिद्धि पावतो. **तात्पर्य.**—द्रव्यवानास सर्व अनुकूल होतात.

वयोवृद्धास्तपोवृद्धा ज्ञानवृद्धास्तथापरे ॥
तेसर्वेधनवृद्धस्य द्वारेतिष्ठंतिकिंकराः ॥ १६ ॥

**अर्थ.**—वयोवृद्ध, तपोवृद्ध व ज्ञानवृद्ध तसेंच इतर गुणवृद्धादिक ते सर्व धनवृद्धाच्या द्वारांत किंकर होऊन राहतात. **तात्पर्य.**—धनवंताचे सर्व दास होतात.

पतंति खड्गधारासु विशंति मकरालयं ॥
किंनकुर्वंतिसुभगे कष्टमर्थार्थिनोजनाः ॥ १७ ॥

**अर्थ.**—हे कल्याणि द्रव्यार्थिजन खड्गधारेंत पडतात, समुद्रांत प्रवेश करितात. तस्मात् ते कोणतें दुःखकारक कर्म करीत नाहींत? **तात्पर्य.**—मनुष्यें द्रव्याकारितां पाहिजे तीं कर्में करितात.

आयुः कर्मंच वित्तंच विद्यानिधनमेवच ॥

पंचैतानिचसृज्यंते गर्भस्थस्यैवदेहिनः ॥ १८ ॥

**अर्थ.**—जीव मातेच्या गर्भी असतांच त्याचें आयुष्य किती, व तो काय कर्म करील, व त्याला द्रव्य किती प्राप्त होईल, तें आणि त्याची विद्या तसेंच मरण हीं ब्रह्मदेव त्याच्या ललाटीं लेखन करून ठेवितो तदनुसार त्याला हे पांच विषय प्राप्त होतात. **तात्पर्य.**—ब्रह्म लिखिताप्रमाणेंच जें प्राप्त होणें आहे तें होतें.

दैवंफलतिसर्वत्र नविद्यानचपौरुषं ॥
पाषाणस्यकुतोविद्या ययादेवत्वमागतः ॥ १९ ॥

**अर्थ.**—सर्वत्र दैवच प्राधान्य होय. विद्या व पराक्रम यांचा कांहीं उपयोग नाहीं. पाषाणानें अशी कोणती विद्या संपादन केली होती की, त्यामुळें त्यास देवपणा आला. **तात्पर्य.**—श्रेष्ठत्व, लघुत्व ` सर्व प्रारब्धाधीन आहे.

कर्मायत्तंफलंपुंसां बुद्धिःकर्मानुसारिणी ॥
तथापिसुधियाभाव्यं सुविचार्यैवकुर्वता ॥ २० ॥

**अर्थ.**—कर्मानुसार फळ होतें, आणि बुद्धिहि कर्मानुसारच होते ही गोष्ट तर खरीच तथापि बुद्धिमंतानें उत्तम विचार करूनच आचरण करीत असावें. **तात्पर्य.**—नशीबावरच केवळ अवलंबून राहूं नये. सुविचारानें वर्तत असावें.

किंकरोतिनरःप्राज्ञः शूरोवाप्यथपंडितः ॥
दैवंयस्यछलान्वेषि करोतिविफलाःक्रियाः ॥ २१ ॥

**अर्थ.**—दैव ज्यास छलाविषयीं शोधीत आहे तो पुरुष बुद्धिमान, शूर अथवा पंडित असला तरी तो काय करितो? कारण तें दैव त्याच्या सकलक्रिया व्यर्थ करतें. **तात्पर्य.**—दैव प्रतिकूळ असल्यानें तेथें कांहींच उपाय चालत नाहीं.

दैवमुल्लंघ्ययत्कार्यं क्रियतेफलवन्नतत् ॥
सरोंभश्चातकेनात्तं गलरंध्रेणगच्छति ॥ २२ ॥

**अर्थ.**—दैवाचें उल्लंघन करून जें कार्य केलें तें फलयुक्त होत नाहीं; पहा कीं, चातकानें सरोवरांतील उदक प्राशन केलें तरी तें त्याच्या कंठछिद्रांतून बाहेर पडतें. **तात्पर्य.**—उदयकाळ आल्यावांचून प्राप्ति होत नाहीं.

**दैवेविमुखतांयाते नकोप्यस्तिसहायवान् ॥**
**पितामातातथाभार्या भ्रातावाथसहोदरः ॥ २३ ॥**

**अर्थ.**—दैव विमुख झालें असतां त्याकालीं पिता, माता तशाच भार्या, बांध अथवा सहोदरबंधु हे कोणीहि सहाय्य करीत नाहींत तेव्हां इतरांची का कथा ? तात्पर्य.—एक दैव अनुकूल नसलें, म्हणजे सर्वच प्रतिकूळ होतात

**यादृशीजायतेबुद्धि र्व्यवसायोपितादृशः ॥**
**सहायास्तादृशाएव यादृशीभवितव्यता ॥ २४ ॥**

**अर्थ.**—ज्याची जशी भवितव्यता म्हणजे दैवानें पुढें होणारी दश असते तदनुरूप त्याची बुद्धि पूर्वींच होते, त्याच्या बुद्धीचा निश्चयहि तद नुसारच होतो; त्यास सहायहि त्याप्रमाणेंच मिळतात; दैवानें जें होणार आ त्याप्रमाणें त्याला सर्व अनुकूल होतें. दैवास अन्यथा करणें असा सम कोणीच नाहीं. तात्पर्य.—पुढें जसें होणार तदनुसार सर्व अनुकूलता होते

**सच्छिद्रोमध्यकुटिलः कर्णःस्वर्णस्यभाजनं ॥**
**धिग्दैवनिहतंनेत्रं पात्रंकज्जलभस्मनः ॥ २५ ॥**

**अर्थ.**—कान, प्रशस्त छिद्र व मध्यभाग वक्र यांनीं युक्त आहे त तो सुवर्णालंकार धारणास पात्र झाला आहे आणि नेत्र, सौंदर्ययुक् असूनहि दैवानें पराभूत असल्यामुळें तो काजळरूप भस्म धारणास पा झाला आहे तस्मात् दैवप्रतिकूळ वस्तूला धिक्कार असो. तात्पर्य.—दुर्गुण्या सुदैव अनुकूळ असतां जो सत्कार होतो तो गुणवान निर्दैव्याचा होत नाहीं

**रोगशोकपरीताप बंधनव्यसनानिच ॥**
**आत्मापराधवृक्षाणां फलान्येतानिदेहिनां ॥ २६ ॥**

**अर्थ.**—रोग, शोक, अतिताप, बंधन, व दुःख हीं देहधारी जीवां आपल्या अपराधरूप वृक्षांचीं फळें भोगकालीं प्राप्त होतात. तात्पर्य.— दुःखें हीं स्वकर्मांचींच फळें होत.

**रहस्यभेदोयाञ्चाच नैष्ठुर्यंचलचित्तता ॥**
**क्रोधोनिःसत्यताद्यूत मेतन्मित्रस्यदूषणं ॥ २७ ॥**

**अर्थ.**—गुह्योद्घाटन, याचना, निष्ठुरत्व, चंचल चित्त असणें, क्रोध

असत्यता, व द्यूत हीं मित्रत्वास दूषणें आहेत. तात्पर्य.—मनास दुःख देणारीं कर्मे हीं मित्रत्वास दूषणें होत.

शुचित्वंत्यागिताशौर्यं सामान्यंसुखदुःखयोः ॥
दाक्षिण्यंचानुरक्तिश्च सत्यताचसुहृद्गुणाः ॥ २८ ॥

**अर्थ.**—चित्तशुद्धि, दानशीलपणा, शूरत्व, सुख दुःख काळीं समान स्थिति, सरळ भाव, प्रीति व सत्यत्व हे मैत्रीचे गुण आहेत. **तात्पर्य.**—मित्रत्वाचे ठिकाणीं भेद नसावा.

नविश्वसेत्कुमित्रेच मित्रेचापिनविश्वसेत् ॥
कदाचित्कुपितंमित्रः सर्वगुह्यंप्रकाशयेत्॥ २९ ॥

**अर्थ.**—कुमित्राचे ठायीं विश्वास ठेवूं नये, आणि मित्रावरहि ठेवूं नये, कोणे एके समयीं मित्र कोपला तर आपलें सर्व गुह्य लोकांमध्यें प्रसिद्ध करण्यास चुकणार नाहीं. **तात्पर्य.**—गूढ कोणासच सांगू नये,

परोक्षेकार्यहंतारं प्रत्यक्षेप्रियवादिनं ॥
वर्जयेत्तादृशंमित्रं विषकुंभंपयोमुखम् ॥ ३० ॥

**अर्थ.**—कुमित्राचें लक्षण समक्ष प्रियहितकर बोलून पाठिमागे नाश करणारा असा जो मित्र तो जसा विषानें भरलेला घट असून मुखीं मात्र ज्याच्या दुध अशा घटा सारिखा कुमित्र वर्ज्य करावा. **तात्पर्य.**—कुमित्राशीं मैत्री करूं नये.

ददातिप्रतिगृण्हाति गुह्यमाख्यातिपृच्छति ॥
भुंक्तेभोजयतेचैव षड्विधंप्रीतिलक्षणम् ॥ ३१ ॥

**अर्थ.**—आपली वस्तु मित्रास देतो, मित्रानें दिली ती घेतो, आपली गुजगोष्ट मित्रास सांगतो, मित्राची पुसतो, मित्राचे घरीं जेवावयास जातो आणि त्यास आपल्या घरीं जेवावयास बोलावितो. हे सहा प्रकार प्रीतीचे आहेत. **तात्पर्य.**—प्रीतीचे ठिकाणीं भेद नसतो.

नदानैः शुद्ध्यतेनारी नोपवासशतैरपि ॥
नतीर्थसेवयातद्वत् भर्तुःपादोदकैर्यथा ॥ ३२ ॥

**अर्थ.**—स्त्री अनेक दानादिकांनीं आणि शतशः उपोषणांनीं

तशीच तीर्थ सेवनांनीं शुद्ध होत नाहीं. जशी ती पतिव्रता स्त्री आपले पतीचें चरणतीर्थ प्राशनांनीं शुद्ध होते, तशी तीर्थव्रतांनीं होत नाहीं. तात्पर्य.—स्त्रियांस पतीपेक्षां दुसरें कोणतेंच दैवत नाहीं, सेवा करणें हेंच सर्व व्रतांचें फळ होय.

**पतेराज्ञांविनानारी उपोष्यव्रतचारिणी ॥**
**आयुष्यंहरतेभर्तुः सानारीनरकंव्रजेत् ॥ ३३ ॥**

**अर्थ.**—पतीच्या आज्ञेवांचून जी स्त्री उपोषणकरून व्रताचरण करिते ती पतीच्या आयुष्यातें हरण करिते आणि आपणहि नरकाप्रत पावते. तात्पर्य.—पतीची आज्ञा उल्लंघन करण्यापेक्षां स्त्रियांस दुसरें पातक नाहीं.

**जल्पंतिसार्द्धमन्येन पश्यंत्यन्यंसविभ्रमाः ॥**
**त्हृदयेचिंतयंत्यन्यं नारीणांनेकतोरतिः ॥ ३४ ॥**

**अर्थ.**—स्त्रियांची प्रीति एकत्र असत नाहीं ती कशी ती सांगतों. स्त्रिया एका पुरुषा सहवर्तमान भाषण करितात, आणि विलाससहित एका प्रति पाहत असतात. तसेंच अन्यातें चिंतितात. तात्पर्य.—जसें पुरुषाचें मन परस्त्रीवर जातें, तद्वतच स्त्रियांचें मनहि परपुरुषावर जातें.

**अनृतंसाहसंमाया मूर्खत्वमतिलोभता ॥**
**अशौचंनिर्दयत्वंच स्त्रीणांदोषाःस्वभावजाः ॥ ३५ ॥**

**अर्थ.**—मिथ्याभाषण, अविचारांनीं कर्म करणें, कपट, मूर्खपणा, फार लोभ, अमंगळपणा, तसाच निर्दयपणा, हे सात स्त्रियांचे स्वाभाविक दोष जाणावे. तात्पर्य.—दुष्टगुण हे स्त्रियांस जन्मताच प्राप्त होतात.

**साभार्यायाशुचिर्दक्षा साभार्यायापतिव्रता ॥**
**साभार्यायापतिप्रीता साभार्यासत्यवादिनी ॥ ३६ ॥**

**अर्थ.**—जी पवित्र कर्माचेठायीं सावध, चतुर, आणि पतिव्रता, पतीचेठायीं अखंड जीची प्रीति आणि सत्यभाषण करणारी तीच भार्या म्हणजे पोषण करावयास योग्य होय. तात्पर्य.—सद्गुणांनीं युक्त स्त्री पासूनच पतीस खरें सौख्य प्राप्त होतें.

स्त्रीणांद्विगुणमाहारो लज्जासापिचतुर्गुणा ॥
साहसंषड्गुणंचैव कामश्चाष्टगुणःस्मृतः ॥ ३७ ॥

**अर्थ.**—पुरुषांपेक्षां स्त्रियांचा आहार द्विगुणित आहे तशी लज्जाहि चतुर्गुणित, तसेंच साहसकर्म ह्मणजे अविचारांनीं करणें तेंहि षड्गुण अधिक, तसा कामहि आष्टगुण अधिक जाणावा. तात्पर्य.—काम उत्पन्न करणारे गुण स्त्रियांस अधिक असतात.

अजातमृतमूर्खाणांवर माद्यौनचांतिमः ॥
सकृदुःखकरावाद्या वंतिमस्तुपदेपदे ॥ ३८ ॥

**अर्थ.**—मुळींच न झालेला, मृत, व मूर्ख अशा त्रिवर्ग पुत्रांत पहिले दोन बरे, परंतु अंतींचा चांगला नाहीं कारण प्रथम दोघे एकवारच दुःख कारक होतात; व शेवटचा तर पदोपदीं दुःखदायक होतो. तात्पर्य.—दुर्लौकिक करणाऱ्या पुत्रापेक्षां मुळींच पुत्र नसेल तर त्यांत अधिक सौख्य आहे.

एकोपिगुणवान्पुत्रो निर्गुणैश्चशतैरपि ॥
एकश्चंद्रस्तमोहंति नचताराःसहस्रशः ॥ ३९ ॥

**अर्थ.**—गुणवान् एकच पुत्र जरी असला तरी तो बहुतांपेक्षां अधिक जाणावा, निर्गुणी शतपुत्र जरी असले तरी ते व्यर्थ, त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. यास दृष्टांत असा कीं, एक चंद्र सर्व अंधःकार दूर करितो, सहस्रशः नक्षत्रे अल्पहि अंधकार दूर करण्यास समर्थ नाहींत, तेव्हां तीं असून काय उपयोग ! तात्पर्य.—शत मूर्खपुत्रांपेक्षां एकच सुपुत्र बरा होय.

एकेनापिसुवृक्षेण पुष्पितेनसुगंधिना ॥
वासितंतद्वनंसर्वं सुपुत्रेणकुलंयथा ॥ ४० ॥

**अर्थ.**—वन मोठें विस्तीर्ण बहुव्याप्त आहे तथापि पुष्पित सुगंधयुक्त एका वृक्षानेंहि तें सर्व वन सुशोभित सुगंधयुक्त होतें. तसें सुपुत्राचे योगानें सर्व कुल शोभा पावतें. तात्पर्य.—एक सुपुत्र सर्व कुलास पावन करितो.

एकेनापिसुपुत्रेण विद्यायुक्तेनसाधुना ॥

आल्हादितंकुलंसर्वं यथाचंद्रेणशर्वरी ॥ ४१ ॥

**अर्थ.**—विद्वान् असून साधु अशा एका सुपुत्रानें संपूर्ण कु आनंदयुक्त होतें. जशी रात्र चंद्रानें सर्वांस आनंदकारक शोभायमा होते. **तात्पर्य.**—सुपुत्राचे योगानें सर्व कुलास आनंद होतो.

लालयेत्पंचवर्षाणि दशवर्षाणिताडयेत् ॥
प्राप्तेतुशोडशेवर्षे पुत्रेमित्रवदाचरेत् ॥ ४२ ॥

**अर्थ.**—पुत्राचें लालन त्याचे जन्म दिवसापासून पांच वर्षें पर्यं करावें, नंतर दहा वर्षें त्यास शिक्षेविषयीं ताडन करावें, सोळावें वर्ष प्रा झालें असतां पुत्राविषयीं मित्राप्रमाणें वर्तावें. **तात्पर्य.**—पुत्र वया आल्यावर त्याच्याशीं मित्रवत् आचरण ठेवावें.

लालनाद्बहवोदोषा स्ताडनाद्बहवोगुणाः ॥
तस्मात्पुत्रंचशिष्यंच ताडयेन्नतुलालयेत् ॥ ४३ ॥

**अर्थ.**—गोडभाषण, आलिंगनादिकेंकरून मुलाचें लालन करं येणेंकरून मातापितरांस फार दोष आहेत. यास्तव विद्येविषयीं पुत्रा अथवा शिष्याचें लालन न करितां ताडनच करावें. **तात्पर्य.**—विद्य शिकविण्याचे कामीं लाड करूं नये.

मातावैरीपिताशत्रु र्बालोयेननपाठ्यते ॥
सभामध्येनशोभंते हंसमध्यें बकोयथा ॥ ४४ ॥

**अर्थ.**—ज्या मातापितरांनीं आपले पुत्र पढविले नाहींत ती मात वैरी आणि तो बाप शत्रु, हंसामध्यें जसे बक शोभत नाहींत तसे ते अवि द्वान विद्वानांच्या सभेंत सन्मान पावत नाहींत. **तात्पर्य.**—ज्या मात पितरांनीं विद्याभ्यास करविला नाहीं ते शत्रू समजावे.

पुत्राश्चविविधैःशीलै र्नियोज्याःसततंबुधैः ॥
नीतिज्ञाःशीलसंपन्ना भवंतिकुलपूजिताः ॥ ४५ ॥

**अर्थ.**—ज्ञात्यांनीं आपले पुत्र अनेक उत्तम स्वभावांनीं संपन्न होत असें करावें ह्मणजे ते सुस्वभावयुक्त नीति जाणणारे स्वकुल पूजि होतात. **तात्पर्य.**—पुत्रांस सर्व विद्येंत संपन्न करावें.

परान्नेनमुखंदग्धं हस्तौदग्धौप्रतिग्रहात् ॥
परस्त्रीभिर्मनोदग्धं कुतःशापःकलौयुगे ॥ ४६ ॥

**अर्थ.**—मुख परान्नानें दग्ध झालें; हात प्रतिग्रहानें दग्ध झाले, व मन परस्त्री चिंतनानें दग्ध झालें यास्तव कलियुगांत शाप कोठून सफल होईल ! **तात्पर्य.**—कलियुगांत मनुष्य क्रियाभ्रष्ट झाल्यानें शाप सफळ होत नाहींत.

वेपथुर्मलिनंवक्त्रं दीनावाग्गद्गदःस्वरः ॥
मरणेयानिचिन्हानि तानिचिन्हानियाचके ॥ ४७ ॥

**अर्थ.**—अंगीं कंप उत्पन्न होऊन मुख निस्तेज होणें आणि दीनवाणी निघत असून मुखांतून गदगदाकारयुक्त स्वर येणें अशीं हीं जीं मरणकालीं चिन्हें होणारीं तीं याचकाच्या ठिकाणीं याचना करण्याचे समयीं दृष्टोत्पत्तीस येतात. **तात्पर्य.**—दुसऱ्याचे पुढें हात पसरून मागण्यापेक्षा मृत्यु फार चांगला जाणावा.

तृणंलघुतृणात्तूल स्तूलादपिचयाचकः ॥
वायुनाकिंननीतोसौ मामयंप्रार्थयिष्यति ॥ ४८ ॥

**अर्थ.**—तृण हलकें याहून तूल म्हणजे कापूस केवळ हलका होय, त्यापेक्षांहि याचक तर फारच हलका होय, इतका हलका आहे तर त्यास वायू कां उडवून नेत नाहीं असें म्हणाल तर हा याचक केवळ लघु मजप्रतिहि याचना करील या भीतीनें वायु त्यापत अवलोकनहि करीत नाहीं. **तात्पर्य.**—याचक हा सर्वांत हलका गणला आहे.

अर्थाधीताश्चयैर्वेदा स्तथाशूद्रान्नभोजनाः ॥
तेद्विजाःकिंकरिष्यंति निर्विषाइवपन्नगाः ॥ ४९ ॥

**अर्थ.**—द्रव्य संपादनाकरितां ज्यांनीं वेदाध्ययन केलें ते आणि निरंतर शूद्रान्न भक्षण करून पुष्ट झालेले ब्राह्मण निर्विष सर्पांचेपरी कांहींच करावयास शकत नाहींत. **तात्पर्य.**—सत्वहीन कांहींच करूं शकत नाहींत.

दर्शनध्यानसंस्पर्शै र्मत्सीकूर्मीचपक्षिणी ॥
शिशुंपालयतेनित्यं तथासज्जनसंगतिः ॥ ५० ॥

**अर्थ.**—दर्शन, ध्यान, स्पर्श इहींकरून मत्सी आणि कासवीण तशीच पक्षिणी ह्या आपल्या आपत्यातें पाळितात; तसें साधूहि दर्शनादिकांनीं दीन जनांतें रक्षितात. **तात्पर्य.**—साधुदर्शन हें एक प्रकारचें जीविताचें पोषणच होय.

**विकृतिंनैवगच्छंति संगदोषेणसाधवः ॥**
**आवेष्टितोमहासर्पै श्चंदनोनविषायते ॥ ५१ ॥**

**अर्थ.**—जे साधु असतात ते खलांच्या संगदोषानें कदापि विकार पावत नाहींत. यास दृष्टांत असा कीं चंदनवृक्ष असमंतात् महासर्पांनीं वेष्टित केला तथापि तो तत्संबंधी विषानें युक्त होत नाहीं. **तात्पर्य.**—कुसंगतिपासून साधुचे मनास विकार उत्पन्न होत नाहीं.

**साधूनांदर्शनंपुण्यं तीर्थभूताहिसाधवः ॥**
**कालेनफलतेतीर्थं सद्यःसाधुसमागमः ॥ ५२ ॥**

**अर्थ.**—साधुचें दर्शनच पुण्यकारक होय कांकीं साधु तिर्थरूपच आहेत. तीर्थ पुण्यदायक खरें परंतु कालें करून फल देतें आणि साधु समागम तात्काल उत्तम फळातें देतो. **तात्पर्य.**—साधुचें दर्शन तत्काळ फलद्रुप होतें.

**संत्यज्यशूर्पवद्दोषान् गुणान्गृण्हातिपंडितः ॥**
**दोषग्राहीगुणत्यागी पल्लोलइवदुर्जनः ॥ ५३ ॥**

**अर्थ.**—पंडीत सुपाप्रमाणें दोषांचा त्यागकरून गुण ग्रहण करितो आणि दुर्जन स्वभावानें चाळणी सारखा असल्यामुळें तो गुणांचा त्याग करून दोष ग्रहण करितो. **तात्पर्य.**—दुर्जनाची अवगुणावर प्रीति फार असते.

**सुमुखोपिसुवृत्तोपि सन्मार्गेपतितोपिच ॥**
**महतांपादलग्नोपि व्यथयत्येवकंटकः ॥ ५४ ॥**

**अर्थ.**—काटा उत्तम मुखानें युक्त जरी आहे व चांगला वर्तुलाकृति असून उत्कृष्ट मार्गांत जरी पडलेला असला आणि यद्यपि मोठयाच्या पायाला लागला तथापि तो जसा व्ययाच देतो तसा दुर्जन, सुंदर मुखयुक्त, सदाचारी, सन्मार्गांत वर्तणारा व महात्म्याच्या पाया पडणारा असा जरी असला तरी तो दुःखदायकच जाणावा. **तात्पर्य.**—दुर्जन कसाहि अ. ला तथापि तो दुःखच देणारा होय.

दुर्जनंसुजनंकर्तुं नोपकारशतैरपि ॥
अपानंमृत्सहस्रेण धौतंचास्यंकथंभवेत् ॥ ५५ ॥

**अर्थ.**—उपकारांच्या अनेक शतांनींहि दुर्जनास सुजन करण्याविषयीं कोणी समर्थ नाहीं यास दृष्टांत असा कीं, अपानद्वार ( गुदस्थान ) मृत्तिकेनें सहस्र वेळां धुतलें तरीं तें मुख कसें होईल? **तात्पर्य.**—दुर्जनाचा सुजन कधींहि होणार नाहीं.

सर्पःक्रूरःखलःक्रूरः सर्पात्क्रूरतरःखलः ॥
मंत्रेणशाम्यतेसर्पो नखलःशाम्यतेकदा ॥ ५६ ॥

**अर्थ.**—सर्प क्रूर असून खलाहि क्रूर आहे; परंतु त्यांत सर्पापेक्षांहि खल ( दुष्ट ) अत्यंत क्रूर आहे; कारण सर्प मंत्रानें शांत होतो आणि खल कदापि कोणत्याहि उपायानें शांत होत नाहीं. **तात्पर्य.**—सर्पापेक्षांहि खल अधिक घातक जाणावा.

मुर्खस्तुपरिहर्तव्यः प्रत्यक्षोद्विपदःपशुः ॥
भिद्यतेवाक्यशल्येन अदृशंकंटकोयथा ॥ ५७ ॥

**अर्थ.**—मुर्ख आपणापासून दूर करावा त्याशीं सहवास करूं नये, कां कीं तो दोन पायांचा पशूच होय, जसा कंटक अंधातें वेधितो तसा तोहि वाक्बाणेंकरून सर्वांतें भेदितो. **तात्पर्य.**—मूर्खापासून दूर असावें.

दुर्जनेचैवसर्पेच वरंसर्पोनदुर्जनः ॥
सर्पोदंशतिकालेन दुर्जनस्तुपदेपदे ॥ ५८ ॥

**अर्थ.**—दुर्जन आणि दीर्घद्वेषी सर्प या उभयतांमध्यें सर्प बरा कां कीं सर्प कदाचित् काळें करून दंश करितो, दुर्जन पदोपदीं मर्मच्छेद करितो. **तात्पर्य.**—सर्पापेक्षां दुर्जन अधिक घातक जाणावा.

दुराचारीदुरादृष्टि र्दुरावासीचदुर्जनः ॥
तन्मैत्रीक्रियतेपुंसा नरःशीघ्रंविनश्यति ॥ ५९ ॥

**अर्थ.**—ज्याचें आचरण दुष्ट, ज्याची दृष्टी पापी, अमंगळ स्थानीं राहणारा, व सर्व जनांत दुष्ट अशांची मैत्री जो करितो तो लवकरच नाशातें पावतो. **तात्पर्य.**—दुष्टाची मैत्री नाशास कारण होय.

खलानांकंटकानांच त्रिविधेवप्रतिक्रिया ॥
उपानन्मुखभंगोवा दूरतोवाविसर्जनम् ॥ ६० ॥

**अर्थ.**—खलजन आणि कंटक यांची प्रतिक्रिया ह्मणजे निवारणाची युक्ति तीन प्रकारचीच आहे. उपानह धारण करणें किंवा त्याच्या मुखाचा भंग करणें, अथवा त्याचा दूर त्यागकरणें, याशिवाय चवथी युक्ति नाहीं. तात्पर्य.—दुर्जनास युक्तीनें दूर करावें.

तक्षकस्यविषंदंते मक्षिकायाविषंशिरः ॥
वृश्चिकस्यविषंपुच्छं सर्वांगेदुर्जनोविषं ॥ ६१ ॥

**अर्थ.**—सर्पाच्या दंतांत विष राहतें, आणि मक्षिकेच्या शिराप्रति विष असतें, तसेंच विंचवाचे पुच्छाग्रीं विष असतें, आणि दुर्जन तर सर्वांगी विष रूपच आहे. तात्पर्य.—दुर्जनासारिखें सर्वनाशक असें दुसरें विष नाहीं.

खलःसर्षपमात्राणि परच्छिद्राणिपश्यति ॥
आत्मनोबिल्वमात्राणि पश्यन्नपिनपश्यति ॥ ६२ ॥

**अर्थ.**—जो खल आहे तो इतरांचे दोष मोहरीसारखे अल्प असले तरी त्यांस अवलोकन करितो; आणि तो दुर्जन आपले दोष बिल्वफळा( बेल-फळ ) समान मोठे असले तरी त्या दोषांस पाहून न पाहिल्यासारखें कारि-तो. तात्पर्य.—दुष्ट लोक दुसऱ्याचा कमीपणा उदयास आणितात.

पक्षिणांकाकचांडालः पशूनांचैवकुक्कुटः ॥
मुनीनांकोपचांडलः सर्वचांडालनिंदकः ॥ ६३ ॥

**अर्थ.**—सर्व पक्षांमध्यें काक पक्षी चांडाल ह्मणजे महातीव्र होय, पशू-मध्यें कुक्कुट चांडाल जाणावा, ऋषीमध्यें क्रोध हा महातीव्र सर्व घातकी चांडाल जाणावा, सर्वांमध्यें निंदा करणार तो महाचांडाल जाणावा. तात्पर्य.—निंदकासारखा दुसरा चांडाळ नाहीं.

परस्परस्यमर्माणि येभाषंतेनराधमाः ॥
तएवविलयंयांति वल्मिकोदरसर्पवत् ॥ ६४ ॥

**अर्थ.**—जे अधम पुरुष असतात ते परस्पर एकमेकांचीं मर्मैं जनांत प्रसिद्धीस आणितात, ते आपला नाश करून घेतात, जसा वारूळांतील

सर्प आंतच्याआंत वेष्टित होऊन मृत्यु पावतो, या प्रकारें द्वेषकर्ते आपला नाश आपण पावतात. तात्पर्य.—अधम ( द्वेषी ) मनुष्यें आपले हातानें आपला नाश करून घेतात.

कुठारेदंडनिर्मुक्के भिद्यंतेतरवःकथं ॥
दुर्जनंप्रथमंवंदे सज्जनंतदनंतरं ॥ ६५ ॥

**अर्थ.**—कुऱ्हाडीचा दांडा काढून टाकला ह्मणजे त्यानें वृक्ष कोठून तोडले जातील ? दुर्जन आहेत त्यांना प्रथम अनुकूल करून घ्यावें आणि मग सज्जनांना वळवावें. तात्पर्य.—बहुतकरून नाश करण्याचे कामांत दुर्जन लोक पुढारी असतात ह्मणून अर्थ साधणारानें पहिल्यापासून त्यांच्याच संधानानें घ्यावें.

उद्यमःसाहसंधैर्यं बुद्धिःशक्तिःपराक्रमः ॥
षडेतेयत्रवर्तंते तत्रदेवःसहायकृत् ॥ ६६ ॥

**अर्थ.**—उद्योग, साहस, धैर्य, बुद्धि, शक्ति व पराक्रम हे सहा गुण जेथें असतात तेथें देव सहाय करणार आहे असें जाणावें. तात्पर्य.—चांगल्यास देव सहाय असतो.

कोनयातिवशंलोके मुखेपिंडेनपूरितः ॥
मृदंगोमुखपिंडेन करोतिमधुरध्वनिं ॥ ६७ ॥

**अर्थ.**—जगांमध्ये असा कोण पुरुष आहे की, त्याचे तोंडावर कांहीं टाकिलें असतां तो वश होणार नाहीं ? पहा मृदंगाचे तोंडावरहि पिठाचा पिंड दिला ह्मणजे तो मधुर ध्वनि करूं लागतो. तात्पर्य.—लोभेंकरून वश न होणारा विरळा.

शशिनीवहिमार्तानां धर्मार्तानांरवाविव ॥
मनोनरमतेस्त्रीणां जरयापीडितेपतौ ॥ ६८ ॥

**अर्थ.**—थंडीनें पीडित मनुष्यें चंद्राला व घामानें डवडवलेलीं मनुष्यें सूर्याला पाहून जशीं संतोषित होत नाहींत तद्वत् वृद्धदशेनें पीडित अशा पतीला पाहून तरुण स्त्रीयेचें मन त्याच्या ठिकाणीं रममाण होत नाहीं. तात्पर्य.—वृद्धावर तरुण स्त्रीची प्रीति नसते.

गुणिनंजनमालोक्य निजबंधभशंकया ॥

राजन्लक्ष्मीःकुरंगीव दूरंदूरंपलायते ॥ ६९ ॥

**अर्थ.**—हे राजन् लक्ष्मी गुणिजनास पाहून आपणास बंधन होईल या शंकेने हरिणीसारखी अति दूर पळते. **तात्पर्य.**—गुणी व विद्वान यांजपाशीं लक्ष्मी राहत नाहीं.

पुराणांतेस्मशानांते मैथुनांतेचयामतिः ॥
सामतिःसर्वदाचे त्स्यात्कोनमुच्येतबंधनात् ॥ ७० ॥

**अर्थ.**—पुराण श्रवणानंतर, स्मशानांत प्रेतकर्म आटोपल्यानंतर आणि मैथुनानंतर जी विरक्तबुद्धि उत्पन्न होते, ती जर सर्वकाळ तशीच राहील तर या संसारबंधनापासून कोण मुक्त होणार नाहीं! **तात्पर्य.**—प्राणी जी गोष्ट ज्यावेळेस पाहतो अथवा श्रवण करितो तेवढा वेळ मात्र त्या गोष्टीविषयीं आश्चर्य अथवा पश्चाताप पावतो. त्यापूर्वी अथवा नंतर त्याप्रमाणें आचरण ठेवील तर त्यास पुढें खेद होणार नाहीं.

दिवापश्यतिनोलूको काकोनक्तंनपश्यति ॥
अपूर्वकोपिकामांधो दिवानक्तंनपश्यति ॥ ७१ ॥

**अर्थ.**—घुबडाला दिवसा व कावळ्याला रात्रीं दिसत नाहीं, आणि कामानें अंध झाला त्याला दिवसा व रात्रींहि दिसत नाहीं. **तात्पर्य.**—कामांध मनुष्य शुद्धीवर नसतो.

पतितोपिकराघाते रुत्पतत्येवकंदुकः ॥
प्रायशस्तुसुवृत्ताना मस्थायिन्योविपत्तयः ॥ ७२ ॥

**अर्थ.**—हाताच्या तडाख्यानें चेंडू जरी खालीं पडला तथापि वरच उडतो त्याप्रमाणें चांगल्या स्वभावाचे जे आहेत त्यांच्या विपत्ति बहुतकाल राहत नाहींत. **तात्पर्य.**—चांगल्याचा चांगलाच परिणाम होतो.

सद्भिस्तुलीलयाप्रोक्तं शिलालिखितमक्षरं ॥
असद्भिःशपथेनापि जलेलिखितमक्षरं ॥ ७३ ॥

**अर्थ.**—साधूंनी सहज भाषण केलें तरी तें शिळेवर लिहिलेल्या अक्षरांप्रमाणें समजावें आणि दुर्जनांनीं शपथपूर्वक भाषण केलें तरी तें जलावर लिहिलेल्या अक्षरांसारखें जाणावें. **तात्पर्य.**—सज्जनांचे भाषण कधींच खोटें होत नाहीं.

दिव्यंचूतरसंपीत्वा गर्वनोयातिकोकिलः ॥
पित्वाकर्दमपानीयं भेकोरटरटायते ॥ ७४ ॥

**अर्थ.**—उत्तम अम्ररस प्राशन केला असतांहि कोकिलपक्षाला गर्व होत नाहीं. परंतु बेडूक चिखलांतील पाणी पिऊन मोठमोठ्यानें ओरडतो. तात्पर्य.—हलकटास थोडक्यांत गर्व होऊन अमर्याद वागूं लागतात.

नवित्तंदर्शयेत्प्राज्ञः कस्यचित्स्वल्पमप्यहो ॥
मुनेरपिवनस्थस्य मनश्चलतिदर्शनात् ॥ ७५ ॥

**अर्थ.**—चतुरानें अल्पहि द्रव्य कोणालाच दाखवूं नये. कारण, वनस्थमुनीचेंहि मन धनदर्शनानें चंचळ होतें. तात्पर्य.—धन कोणास सांगूं नये, व दाखवूंहि नये; कारण वनस्थमुनीचें जर मन द्रव्य पाहून चंचल होतें तर संसारी जनांचें होईल यांत संशय नाहीं.

आत्मनोमुखदोषेण बध्यंतेशुकसारिकाः ॥
बकास्तत्रनबध्यंते मौनंसर्वार्थसाधनं ॥ ७६ ॥

**अर्थ.**—राघु व साळुंक्या ह्या आपल्या मुख दोषानें बद्ध होतात आणि त्याच जातींतील बक पक्षी भाषण करीत नसल्यामुळें बद्ध होत नाहींत. यावरून असें सिद्ध होतें कीं, मौन हें सर्व अर्थसिद्धीचें साधन आहे. तात्पर्य.—सहन केल्याशिवाय अर्थसिद्धी होत नाहीं.

परोपदेशेपांडित्यं सर्वेषांसुकरंनृणां ॥
धर्मेस्वयमनुष्ठानं कस्यचित्सुमहात्मनः ॥ ७७ ॥

**अर्थ.**—परोपदेशाविषयीं पांडित्य करणें सर्व मनुष्यांस सुलभ आहे; परंतु स्वतः धर्माविषयीं आचरण घडणें हें तर एखाद्या अतिशयित महात्म्यासच घडतें. तात्पर्य.—दुसऱ्यास उपदेशकरून आपण त्याप्रमाणें वागणें महा कर्म कठीण आहे तस्मात् जे त्याप्रमाणें वागतात ते धन्य होत.

नास्तिक्षुधासमंदुखं नास्तिरोगःक्षुधासमः ॥
नास्त्याहारसमंसौख्यं नास्तिक्रोधसमोरिपुः ॥ ७८ ॥

**अर्थ.**—क्षुधेसारखें दुःख नाहीं, क्षुधेसारखा रोग नाहीं, आहारासारखें सौख्य नाहीं व क्रोधासारखा शत्रु नाहीं. तात्पर्य.—क्षुधा आणि क्रोध हे अत्यंत दुःखदायक आहेत.

मूर्खशिष्योपदेशेन दुष्टस्त्रीभरणेनच ॥
दुःखितैःसंप्रयोगेन पंडितोप्यवसीदति ॥ ७९ ॥

**अर्थ.**—मूर्ख शिष्यांस उपदेश केल्यानें आणि दुष्टस्त्रीचें पोषण केल्यानें तसेंच दुःखित जनांशीं अति सहवासानें विद्वानहि दुःख पावतो.
**तात्पर्य.**—दुःखी मनुष्याचे संगतीनें दुःख प्राप्त होतें.

जिवंतोपिमृताःपंच व्यासेनपरिकीर्तिताः ॥
दरिद्रोव्याधितोमूर्खः प्रवासी नित्यसेवकः ॥ ८० ॥

**अर्थ.**— दरिद्री, रोगी, मूर्ख, प्रवासी व नित्यसेवक हे पांच जिवंत असूनहि मृततुल्य आहेत असें व्यासांनीं सांगितलें आहे. **तात्पर्य.**—ज्यांस सौख्य नाहीं ते मृतवत् जाणावे.

क्वचिद्रुष्टःक्वचित्तुष्टो रुष्टस्तुष्टःक्षणेक्षणे ॥
अव्यवस्थितचित्तस्य प्रसादोपिभयंकरः ॥ ८१ ॥

**अर्थ.**—कदाचित् रुष्ट होणारा व कदाचित् संतुष्ट होणारा असून क्षणांत रुष्ट होणारा व क्षणांत संतुष्ट होणारा अशा अव्यवस्थित चित्तयुक्त पुरुषाची प्रसन्नता झाली तरी ती आपणास भय उत्पन्न करणारी होईल असें समजावें. **तात्पर्य.**—ज्याचें चित्त स्थिर नाहीं अशा पुरुषाच्या प्रसन्नतेपासून भय उत्पन्न होतें.

दुर्मंत्रीराज्यनाशाय ग्रामनाशायकुंजरः ॥
शालकोगृहनाशाय सर्वनाशायमातुलः ॥ ८२ ॥

**अर्थ.**—मंत्री दुष्ट असला म्हणजे राज्याचा नाश करितो, हत्ती माजला असतां गांवाचा नाश करितो, मेहुणा घर नासतो आणि मामा तर सर्वांचीच धुळदाण करितो. **तात्पर्य.**—मामा हा सर्व नाश करणारा होय.

शत्रोरपिगुणावाच्या दोषावाच्यागुरोरपि ॥
सर्वदासर्वयत्नेन पुत्रेशिष्येहितंवदेत् ॥ ८३ ॥

**अर्थ.**—कोणी शत्रु असला तरी त्याचे गुण वर्णन करावे आणि गुरूचेहि दोष बोलावे. याचप्रमाणें पुत्र व शिष्य यांविषयीं सर्व काल सर्व प्रयत्नानें हितोपदेश करावा. **तात्पर्य.**—यथार्थ बोलण्यास दोष नाहीं.

**राजावेश्यायमोअग्नि स्तस्करोबालयाचकौ ॥**
**परदुःखंनजानंति अष्टमोग्रामकंटकः ॥ ८४ ॥**

**अर्थ.**—राजा, वेश्या, यम, अग्नि, तस्कर, बालक, याचक, हे सात आणि आठवा ग्रामकंटक ह्मणजे अन्यत्र कोठेंहि न जातां स्वग्रामांतच राहून लोकांस पीडा करून आपला निर्वाह करणारा, एकूण हे आठ दुसऱ्याच्या दुःखातें जाणत नाहींत, आपलेंच कार्य करितात. **तात्पर्य.**—परदुःख न जाणणाऱ्यास दुसऱ्याची दया येत नाहीं.

**अशक्तस्तुभवेत्साधु र्ब्रह्मचारीचनिर्धनः ॥**
**व्याधितोदेवभक्तश्च वृद्धानारीपतिव्रता ॥ ८५ ॥**

**अर्थ.**—अशक्त ह्मणजे ज्याला कोणताहि प्रपंचांतील उद्योग करावयास सामर्थ्य नाहीं तो साधू होतो, निर्धन ह्मणजे जो द्रव्यहीन तो विषय भोगाविषयीं असमर्थ होतो, आणि नंतर ब्रह्मचर्य धारण करितो, जो व्याधिग्रस्त झाला तो देवभक्त होतो, आणि जी स्त्री पूर्वीं व्यभिचारिणी असते ती वृद्ध झाली असतां पतिव्रता होते, ह्मणजे वृद्धपणीं पतिव्रतेच्यापरि आचरण करिते. **तात्पर्य.**—सामर्थ्य असून विचार करणारा धन्य होय.

**प्रियवाक्यप्रदानेन सर्वेतुष्यंतिजंतवः ॥**
**तस्मात्तदेववक्तव्यं वचनेकिंदरिद्रता ॥ ८६ ॥**

**अर्थ.**—प्रिय भाषणानें सकळ प्राणी संतोषाप्रत पावतात, तस्मात् सर्व जनांस प्रिय जें तेंच बोलावें, अप्रिय भाषणानें इतरांस असंतोषित करूं नये, वचनाविषयीं काय दरिद्रता आहे ? **तात्पर्य.**—कठोर भाषण असंतोष उत्पन्न करणारें होय.

**अतिक्लेशेनयेह्यर्था धर्मस्यातिक्रमेणतु ॥**
**शत्रूणांप्रणिपातेन तेअर्थामाभवंतुमे ॥ ८७ ॥**

**अर्थ.**—अति क्लेशानें जें अर्थसाध्य, तसेंच धर्माच्या उल्लंघनानें जें साध्य, आणि शत्रूला नमस्कार करून जें प्राप्त होणार तें अर्थ मला प्राप्त नसोत अशा अर्थाचें कांहींच प्रयोजन नाहीं. **तात्पर्य.**—अतिश्रम व अतिअधर्म करून आणि शत्रूला शरण जाऊन द्रव्य मिळविण्यांत अर्थ नाहीं.

परैःप्रोक्तागुणायस्य निर्गुणोऽपिगुणीभवेत् ॥
इंद्रोपिलघुतांयाति स्वयंप्रख्यापितैर्गुणैः ॥ ८८ ॥

**अर्थ.**—ज्याचे गुणांचें अन्यजन वर्णन करितात तो पुरुप निर्गुण असताहि गुणवान होतो आणि जो आपल्या गुणातें आपणच वर्णितो तो गुणसंपन्न इंद्र असताहि लघुत्वाप्रत पावतो. **तात्पर्य.**—आत्म स्तुतीनें लघुत्व प्राप्त होतें.

अयुक्तंस्वामिनोयुक्तं युक्तंनीचस्यदूषणम् ॥
अमृतंराहवेमृत्यु र्विषंशंकरभूषणम् ॥ ८९ ॥

**अर्थ.**—अयोग्यहि जरी कर्म केलें तथापि तें थोरांस योग्यच होतें का कीं, त्यांतें दुपण ठेवण्याविषयीं कोणीहि समर्थ नाहीं, नीचानें उचित कर्म केलें असताहि त्याला तें दूषणच होतें, कारण कीं, त्याची भीति कोणीहि धरीत नाहींत, त्याला शब्द ठेवण्याविषयीं सर्व शक्तिमंत होतात, पहा अमृत-पान उत्तम परंतु राहुला नीचपणामुळें तें मारक झालें आणि विषपान हें अनुचित परंतु तें महत्वास्तव शंकरास भूषण झालें. **तात्पर्य.**—मो-ठयांनीं कांहीं केलें तरी साजतें.

यस्यचित्तंद्रवीभूतं कृपयासर्वजंतुषु ॥
तस्यज्ञानेनमोक्षेण किंजटाभस्मलेपनैः ॥ ९० ॥

**अर्थ.**—ज्याचें चित्त कृपेनें सर्व प्राणि मात्रांचे ठायीं द्रवयुक्त आहे त्याला ज्ञानेंकरून किंवा मोक्षेंकरून अथवा जटाधारणेंकरून तसेंच भस्म लेपनांनीं काय होणार आहे ! **तात्पर्य.**—आत्मवस्तु प्राप्ती विषयीं सर्व भूतमात्रीं दया असणें हेंच थोर साधन होय.

यस्माच्चप्रियमिच्छेत तस्यब्रूयात्सदाप्रियम् ॥
व्याधोमृगवधार्थीतु गीतंगायतिसुस्वरम् ॥ ९१ ॥

**अर्थ.**—जो ज्यापासून आपलें प्रिय होण्याची इच्छा करितो त्याणें त्यास निरंतर प्रिय वाक्य बोलून मोहीत करावा, आणि आपलें प्रिय क-रावें; दृष्टांत आपलें प्रिय इच्छिणारा व्याध ह्मणजे पारधी मृगातें वधावया कारणें पूर्वीं त्याला प्रिय मोहक सुस्वर गायन करितो आणि आपलें जें प्रिय तें संपादन करितो. **तात्पर्य.**—कार्य साधणें तें प्रिय वाक्य बोलून साधावें.

उत्पन्नपश्चात्तापस्य बुद्धिर्भवतियादृशी ॥
तादृशीयदिपूर्वस्या त्कस्यनस्यान्महोदयः ॥ ९२ ॥

**अर्थ.**—कोणतेंहि अनुचित कर्म करणाऱ्या पुरुषास त्या अयोग्य कर्मे करून पश्चाताप झाल्यानंतर जशी बुद्धि निर्मळ होते तशी मति जर पूर्वीच होईल तर कोणाचें कल्याण होणार नाहीं? तर होईलच. **तात्पर्य.**—अनुचित कर्मापूर्वी सुविचार केला असतां त्यापासून पुढे दुःख होत नाहीं.

पुनर्वित्तंपुनर्मित्रं पुनर्भार्यापुनर्मही ॥
एतत्सर्वंपुनर्लभ्यं नशरीरंपुनःपुनः ॥ ९३ ॥

**अर्थ.**—द्रव्य, मित्र, आणि स्त्री तशीच मही ह्मणजे राज्य हीं सर्व नाशाप्रत पावलीं असतां पुरुषास पुनः पुनः प्राप्त होतात परंतु सर्व पुरुषार्थांचे साधनाचें कारण जें शरीर तें नाश पावलें असतां पुनः प्राप्त होईल हा निश्चय नाहीं याकरितां फार प्रयत्नानें त्याचें रक्षण करावें. **तात्पर्य.**—शरीर हें एकवारच मिळतें, ह्मणून त्यास फार जपावें.

गतेशोकोनकर्तव्यो भविष्यंनैवचिंतयेत् ॥
वर्तमानेनकालेन प्रवर्ततेविचक्षणाः ॥ ९४ ॥

**अर्थ.**—कोणतीहि वस्तू नाश पावली असतां तिचा शोक न करावा, पुढें प्राप्त होणार त्या वस्तुचें चिंतनहि न करावें, ज्ञाते पुरुष ज्या काळीं जें प्राप्त होतें त्याणेंच संतुष्ट राहताहेत. **तात्पर्य.**—जें प्राप्त होतें त्यांतच सुख मानून घ्यावें.

जलबिंदुनिपातेन क्रमशःपूर्यतेघटः ॥
सहेतुःसर्वविद्यानां धर्मस्यचधनस्यच ॥ ९५ ॥

**अर्थ.**—उदकाच्या बिंदु बिंदुनें घट भरतो याप्रकारें क्षणोक्षणीं विद्याभ्यास केल्यानें ती पूर्ण होते, अल्प अल्प धर्म केला असतां तोहि वृद्धि पावतो, तसेंच धन थोडें थोडें संपादिलें असतां पुष्कळ संग्रह होतो. **तात्पर्य.**—कोणतेंहि कांहीं एकेच काळीं वृद्धिंगत होत नाहीं.

धनधान्यप्रयोगेषु विद्यासंग्रहणेतथा ॥

आहारेव्यवहारेच त्यक्तलज्जःसुखीभवेत् ॥ ९६ ॥

**अर्थ.**—धन आणि धान्य संपादन करण्याच्या उपायांविषयीं, विद संग्रहाविषयीं, भोजन करण्याविषयीं, तसाच व्यवहारी जो लज्जा सोडील सुखी होईल. **तात्पर्य.**—प्राप्ति करून घेण्याच्या कामांत लज्जा धरूं न

विषस्यविषयाणांहि दृश्यतेमहदंतरं ॥
उपभुक्तंविषंहंति विषयःस्मरणादपि ॥ ९७ ॥

**अर्थ.**—विष आणि विषय यांच्यामध्यें महदंतर दृष्टीस पडतें, वि सेवन केल्यानंतर नाश करितें परंतु विषयाचें स्मरण होण्याबरोबर नाशा कारण घडतें. **तात्पर्य.**—विषापेक्षांहि विषय अधिक नाशक जाणावा.

दिपोभक्षयतेध्वान्तं कज्जलंचप्रसुयति ॥
यदन्नंसेवतेनित्यं जायतेतादृशीप्रजा ॥ ९८ ॥

**अर्थ.**—दीप अंधारातें खाऊन काजळ निष्पन्न करितो, ठीकच आ नेहमीं ज्याचें अन्न खावें त्याचे सारखें व्हावें. **तात्पर्य.**—ज्याचें अ खावें त्याच्या सारखीच बुद्धि उत्पन्न होते.

विद्वानेवविजानाति विद्वज्जनपरिश्रमं ॥
नहिवंध्याविजानाति गुर्वीप्रसववेदनां ॥ ९९ ॥

**अर्थ.**—विद्वानांचे परीश्रम जाणण्यास विद्वानच समर्थ होत, मूर्ख हं कांस तें समजत नाहींत. जसा प्रसव वेदनांचा दारुण प्रसंग वंध्या जाण नाहींत. **तात्पर्य.**—ज्याची ज्यास माहिती आहे तोच तें जाणूं शकत

नागुणीगुणिनंवेत्ति गुणीगुणिषुमत्सरी ॥
गुणीचगुणरागीच विरलःसरलोजनः ॥ १०० ॥

**अर्थ.**—अविद्वान विद्वानांस जाणत नाहींत, आणि विद्वान विद्वानां मत्सर करितात. तेव्हां विद्वान असून विद्वानांवर प्रीति करणारा सर मनाचा मनुष्य फार दुर्मिळ होय. **तात्पर्य.**—विद्वान असून विद्वानां प्रीति करणारा क्वचितच.

नकठोरंनवातीक्ष्ण मायुधंपुष्पधन्वनः ॥

अर्थ.—जेथें विद्वज्जन नाहीं तेथें अल्पबुद्धिमान्हि स्तुत्य होतो यास दृष्टांत वृक्ष रहित प्रदेशांत एरंडहि वृक्षत्वानें मान्य होतो. तात्पर्य.—उत्तमाचा लाभ होईंपर्यंत अल्पाची प्रतिष्ठा असते.

परोपकारशून्यस्य धिङ्मनुष्यस्यजीवितं ॥
यावंतःपशवस्तेषां चर्माप्युपकरिष्यति ॥ १०३ ॥

अर्थ.—मनुष्याचें जीवित जर परोपकार रहित असलें तर त्यास धिक्कार असो. कारण, जितके पशु आहेत त्या सर्वांचें चर्महि उपकाराविषयीं उपयोगी पडतें. तात्पर्य.—मनुष्याचें जीवित धन्य होण्यास परोपकारासारखें दुसरें साधन नाहीं.

तावत्कुलस्त्रीमर्यादा यावल्लज्जावगुंठनं ॥
स्त्रस्तेतस्मिन्कुलस्त्रीभ्यो वरंवेश्यांगनाजनः ॥ १०४ ॥

अर्थ.—जोंपर्यंत लज्जेचें आवरण आहे तोंपर्यंतच कुलस्त्रियांची मर्यादा समजावी, आणि तें लज्जेचें आवरण निघून गेलें असतां त्या कुलस्त्रियांपेक्षां वेश्यास्त्रिया श्रेष्ठ जाणाव्या. तात्पर्य.—लज्जाहि कुलस्त्रियांची मर्यादा होय.

असारेखलुसंसारे सारंश्वशुरमंदिरं ॥
हरोहिमालयेशेते हरिःशेतेमहोदधौ ॥ १०५ ॥

अर्थ.—निश्चित असार स्वरूप संसारांत श्वशुरगृह हें एक सार आहे अतएव शंकर हिमालयावर निद्रा करितात व विष्णु क्षीरसमुद्रांत निद्रा करितात. तात्पर्य.—ही अन्योक्ति आहे.

षट्कर्णोभिद्यतेमंत्र श्चतुष्कर्णःस्थिरोभवेत् ॥
द्विकर्णस्यचमंत्रस्य ब्रह्माप्यंतंनगच्छति ॥ १०६ ॥

अर्थ.—षट्कर्ण ह्मणजे त्रिवर्गांनीं केलेली मसलत फुटते, आणि
र्कर्ण ह्मणजे दोघांनीं केलेली मसलत स्थिर होते व द्विकर्ण ह्मणजे
त्याच्या मसलतीचा अंत ब्रह्मदेवासहि लागत नाहीं. तात्पर्य.—
त्याची मसलत त्यानेंच सांगितल्या शिवाय प्रसिद्ध होण्याचा मुळींच
नाहीं. दोघांची एकाएकी प्रयासावांचून फुटत नाहीं, परंतु तीन
आधिक मनुष्यांची मसलत फुटल्याशिवाय कधींहि राहत नाहीं.

**कृपणोधनलोभेन स्वांभार्यांनाभिगच्छति ॥**
**अस्यांयोजायतेपुत्रः समेवित्तंहरेदिति ॥ १०७ ॥**

अर्थ.—कृपण धन लोभामुळें आपल्या भार्येशीं संग करीत नाहीं
रण इच्या उदरीं जो पुत्र होईल तो माझें वित्त हरण करील ही भीति त्य
मनांत असते. तात्पर्य.—कृपण मनुष्याला द्रव्य प्राणा पलिकडे
धन खर्चून सौख्य घेणें तें विषासारखें वाटतें.

**नान्नोदकसमंदानं नतिथिर्द्वादशीसमा ॥**
**नगायत्र्याःपरोमंत्रो नमातुर्दैवतंपरं ॥ १०८ ॥**

अर्थ.—अन्न आणि उदक यांचे दानासारखें दुसरें श्रेष्ठ दान नाहीं,
दशी सारखी दुसरी तिथी नाहीं, गायत्रीमंत्राहून दुसरा श्रेष्ठ मंत्र नाहीं, अ
मातेहून श्रेष्ठ दैवत दुसरें कोणतेंच नाहीं. तात्पर्य.—मातेसारखें
आणि अन्न उदकाच्या दानासारखें दुसरें कोणतेंच दान नाहीं.

**पुस्तकेषुचयाविद्या परहस्तेषुयद्धनम् ॥**
**उत्पन्नेषुचकार्येषु नसाविद्यानतद्धनम् ॥ १०९ ॥**

अर्थ.—ज्याची विद्या पुस्तकाच्या ठायींच आहे ह्मणजे ज्याला पुस्त
वांचून कांहींच येत नाहीं, आणि ज्याचें धन परहस्तगत आहे, त्या
षाला त्या विद्येचें किंवा त्या द्रव्याचें कांहीं कार्य प्राप्त झालें असतां उपयो
पडत नाहीं यास्तव ती विद्या आणि तें धनहीं त्याचीं नव्हेत. तात्पर्य.—
पुस्तकीं विद्या व परहस्त धन हीं वेळेवर उपयोगी पडत नाहींत.

**वरंप्राणपरित्यागो मामानपरिखंडनम् ॥**
**प्राणत्यागःक्षणंचैव मानभंगोदिनेदिने ॥ ११० ॥**

**अर्थ.**—सकळ दान आणि [illegible] परंतु सत्पात्रीं जें दान अर्पिलें तें आणि सर्व भुतीं अभय देणें हीं दोन मात्र कधींहि क्षय पावत नाहींत. **तात्पर्य.**—सत्पात्रीं दान व सर्वांभुतीं दया या पुण्यांचा कधींहि नाश होत नाहीं.

**गुणैरुत्तमतांयाति नोच्चैरासनसंस्थितः ॥**
**प्रासादशिखरस्थोपि काकःकिंगरुडायते ॥ ११२ ॥**

**अर्थ.**—पुरुष गुणांनीं श्रेष्ठतेतें पावतो, उच्चासनीं बसला ह्मणोन श्रेष्ठ होतो असें नाहीं. काकपक्षी देवालयाचे शिखरावर उच्चस्थानीं जरी बसला तरी तो गरुडापरी श्रेष्ठ होईल की काय? **तात्पर्य.**—गुणांनींच श्रेष्ठत्व प्राप्त होतें.

**योमोहान्मन्यतेमूढो रक्तेयंमयिकामिनी ॥**
**सतस्यावशगोभूत्वा नृत्येत्क्रीडाशकुंतवत् ॥ ११३ ॥**

**अर्थ.**—जो मूर्ख मोहेंकरून ही स्त्री माझे ठायीं प्रीतियुक्त आहे असें मानितो तो तिच्या स्वाधीन होऊन क्रीडा पक्ष्याचेपरी जशी ती नृत्य करवील तसें नृत्य करित असतो. **तात्पर्य.**—स्त्री लंपट पुरुष स्त्रियांचे आज्ञेत असतात.

**पठंतिचतुरोवेदान् धर्मशास्त्राण्यनेकशः ॥**
**आत्मानंनैवजानाति दर्वीपाकरसंयथा ॥ ११४ ॥**

**अर्थ.**—चारी वेद धर्मादि सकल शास्त्रें सर्व पठण करितात, परंतु आत्म्यातें कोणीच जाणत नाहींत, यास दृष्टांत असा कीं, दर्वी ह्मणजे पळी ती सर्व पाकातें करिते, परंतु त्यांच्या रसातें जाणत नाहीं. **तात्पर्य.**—आंतील तत्व समजल्याशिवाय पाठ करणें व्यर्थ होय.

**दूरागतंपथिश्रांतं वृथाचगृहमागतम् ॥**
**अनर्चयित्वायोभुंक्ते सवैचांडालउच्यते ॥ ११५**

**अर्थ.**—दुरून आलेला, मार्गामध्ये श्रमलेला, कार्योद्देशावांचू इजिक जो अतिथी समयीं गृहाप्रत आला, त्याचा यचनादि सत्कार त्याला भोजन दिल्यावांचून जो भोजन करितो तो चांडाळ ह तात्पर्य.—भोजन समयीं कोणीहि आल्यास त्यास भोजन द्यावें.

**अन्यायोपार्जितंद्रव्यं दशवर्षाणितिष्ठति ॥**
**प्राप्तेएकादशेवर्षे समूलंचविनश्यति ॥ ११६ ॥**

**अर्थ.**—अधर्माने मिळविलेलें जें द्रव्य तें त्याजवळ दहा वर्षेपर्यंत अकरावें वर्ष प्राप्त झाले ह्मणजे त्याचें पूर्वीचें धर्मार्जित जें द्रव्य त्यासहवर्तमान नाश पावतें याकरितां द्रव्य मिळवणें तें यथान्यायानें मि तात्पर्य.—अन्यायानें मिळविलेलें द्रव्य फार दिवस राहत नाहीं.

**धर्मंधनंचधान्यंच गुरोर्वचनमौषधम् ॥**
**सुगृहीतंचकर्तव्य मन्यथायोनजीवति ॥ ११७ ॥**

**अर्थ.**—धर्म, धन, धान्य, गुरुवचन आणि औषध ह्या पांच ग्रहण करणें तें उत्तम प्रकारें जसें होईल तसें करावें. जो अन्यथा उत्तम प्रकारें ग्रहण करणार नाहीं तो कल्याण पावणार नाहीं. तात्प हितकारक वस्तूंचें संरक्षण उत्तम रीतीनें करावें.

**अग्निरापःस्त्रियोमुर्खः सर्पोराजकुलानिच ॥**
**नित्यंयत्नेनसेव्यानि सद्यःप्राणहराणिषट् ॥ ११८**

**अर्थ.**—अग्नि, उदक, स्त्रिया, मूर्ख, सर्प, राजे या साहांचें सेव त्नानें निरंतर करावें, गर्वानें सेविलें असतां, तत्काळ प्राणहारक हो यास्तव यांजवळ कधींहि गर्व करूं नये. तात्पर्य.—अग्निचा युक्तीनें जितक्यास तितकें वर्तन ठेवावें.

**अत्यासन्नाविनाशाय दूरस्थानफलप्रदाः ॥**
**सेव्यतांमध्यभागेन राजवन्हिगुरुःस्त्रियः ॥ ११९**

**अर्थ.**—राजा, अग्नि, गुरु, स्त्रिया, यांची सेवा अतिसान्निध्यानें

असतां हे राजादिक नाश करितात, आणि यांपासून अती दूर राहिले तर हे फळप्रद होत नाहींत; यास्तव यांची सेवा करणें ती मध्यवर्तित्वें करून अदूर व असामीप्यें करून करावी, ह्मणजे नाश न करितां फळ देतात. तात्पर्य.—तात्काळ शासन करणाऱ्याची सेवा साधारणपणें केली असतां फलद्रुप होते.

राज्ञिधर्मिणिधर्मिष्ठाः पापेपापाःसमेसमाः ॥
राजानमनुवर्तंते यथाराजातथाप्रजाः ॥ १२० ॥

**अर्थ.**—राजा धर्मयुक्त असतां प्रजाहि धर्माचरण करितात, पापी असल्यास प्रजाहि पापी होतात, राजा धर्माधर्म पक्षपात शून्य असतां प्रजाहि तशाच होतात. तात्पर्य.—जसा राजा होईल त्याच प्रकारें प्रजा होतात.

अनागतविधाताच प्रत्युत्पन्नमतिस्तथा ॥
द्वावेतौसुखमेधेते दैवदृष्टिर्विनश्यति ॥ १२१ ॥

**अर्थ.**—जो दुःखादिक प्राप्त न झालें त्याचे पूर्वींच भय होईल असें समजून त्याच्या नाशाविषयीं जो आपले बुद्धिबळेंकरून उद्योग करितो, ते दोघे सुखानें राहतात; आणि जो आपले प्रारब्धावरच भरंवसा ठेऊन उद्योग कांहींच करित नाहीं, तो नाशाप्रत पावतो. तात्पर्य.—कर्म करण्यापूर्वींच भय बाळगावें हें उत्तम होय.

यस्यस्नेहोभयंतस्य स्नेहोदुःखस्यभाजनम् ॥
स्नेहमूलानिदुःखानि तानित्यक्त्वावसेत्सुखम् ॥१२२॥

**अर्थ.**—कुटुंबाचे मनुष्यांवर जो स्नेह ठेवितो त्यापासून तो भय आणि दुःख पावतो. सर्व दुःखांस मूळ स्नेहच जाणावा. तीं दुःखें ज्यांणीं सोडलीं ते सुखानें राहतात. तात्पर्य.—स्नेह (मोहपाश) हाच दुःखाचें कारण होय.

अनालोक्यव्ययंकर्ता अनाथकलहप्रियः ॥
आतुरःसर्वक्षेत्रेषु नरःशीघ्रंविनश्यति ॥ १२३ ॥

**अर्थ.**—आपल्या आदायातें न पाहतां प्राप्तीपेक्षां अधिक खर्च करणारा, आणि अनाथा सहवर्तमान कलह करावयास जो उत्सुक, सर्व ज्ञातींच्या

स्त्रियांचे ठायीं जो सदैव भोगाविषयीं आतुर तो मानव लवकरच नाश पावतो. तात्पर्य.—अविचारी लोक लवकर नाश पावतात.

**विद्यामित्रंप्रवासेच भार्यामित्रंगृहेषुच ॥**
**व्याधिस्थस्यौषधंमित्रं धर्मोमित्रंमृतस्यच ॥ १२४ ॥**

**अर्थ.**—प्रवासीं विद्या मित्र, तीं मित्रापरी आपलें हित करिते, गृहामध्यें स्त्री मित्र होय, जो व्याधिस्त त्याला औषध मित्र जाणावें, जो मृत्यु पावला त्याला परलोकीं हित करणारा मित्र धर्म होय. **तात्पर्य.**—वेळेवर उपयोगीं पडणारा मित्र होय.

**मातृवत्परदारांश्च परद्रव्याणिलोष्ठवत् ॥**
**आत्मवत्सर्वभूतानि यःपश्यतिसपश्यति ॥ १२५ ॥**

**अर्थ.**—परस्त्रियांतें जो माते सारखे पाहतो, परद्रव्यातें मृतिकेप्रमाणें अवलोकितो, सकल प्राणिमात्रांतें जो आत्मतुल्य पाहतो तो धन्य होतो आणि जो अन्य दृष्टीने पाहतो तो ज्ञानांध होय. **तात्पर्य.**—आत्मवत् दुसऱ्यांस जाणणारा धन्य होय.

**सत्यंमातापिताज्ञानं धर्मोभ्रातादयासखी ॥**
**शांतिःपत्नीक्षमापुत्रः षडेतेममबांधवाः ॥ १२६ ॥**

**अर्थ.**—संसारी जन आपल्या सारखाच ज्ञानी असेल असें समजून ज्ञान्यास विचारतो तुझी मातृपित्रादिक प्रपंचांतील मनुष्यें कोणतीं तीं सांग ? तेव्हां ज्ञानी सांगतो. सत्य ह्मणजे यथार्थ भाषणच माझी माता, ज्ञान ह्मणजे ब्रह्मज्ञान तेंच माझा पिता, धर्म हाच भ्राता, दया हीच बहीण शांति पत्नी, आणि क्षमा माझा पुत्र, या प्रकारचा बांधव मेळा आहे. **तात्पर्य.**—सन्मार्ग हाच ज्ञान्याचें गोत होय.

**कलौदशसहस्रांते हरिस्त्यक्ष्यतिमेदिनीम् ॥**
**तदर्धंजान्हवीतोयं तदर्धंग्रामदेवता ॥ १२७ ॥**

**अर्थ.**—कलियुगाचेठायीं दहा सहस्र वर्षें गेलीं असतां विष्णु पृथ्वीतें त्यागील, पांच सहस्र वर्षांनीं जान्हवी भूमीतें सोडील, अडीच सहस्र वर्षांनीं ग्रामदेवता पृथ्वीतें सोडून जातील. **तात्पर्य.**—कलियुगामुळें महात्में कमि कमी होत चालली आहेत.

आत्पद्वेषाद्भवेन्मृत्युः परद्वेषाद्धनक्षयः ॥
राजद्वेषात्सर्वनाशो ब्रह्मद्वेषात्कुलक्षयः ॥ १२९ ॥

**अर्थ.**—स्वकीय जनाचा द्वेष केला असतां तेणेंकरून मृत्यु प्राप्त होतो, अन्य लोकांचा द्वेष केल्यानें धनाचा नाश होतो, राजाचा द्वेष केला असतां सर्व नाश होतो, आणि ब्राह्मणाच्या द्वेषेंकरून कुलाचा क्षय होतो. **तात्पर्य.**—द्वेष हा नाशक होय.

लुब्धानांयाचकःशत्रु मूर्खाणांबोधकोरिपुः ॥
जारिणीनांपतिःशत्रु श्चोराणांचंद्रमारिपुः ॥ १३० ॥

**अर्थ.**—लोभी जनांस याचक शत्रुसारिखा दिसतो, मुर्खांस हितोपदेश करणारा शत्रूच दिसतो, व्यभिचारिणी स्त्रियांस भ्रतार शत्रु भासतो, आणि चोरांस चंद्रमा शत्रूच दिसतो. **तात्पर्य.**—निंद्यास मंद्य शत्रुवत् भासतात.

सुखार्थींचत्यजेद्विद्यां विद्यार्थींचत्यजेत्सुखं ॥
सुखार्थिनःकुतोविद्या कुतोविद्यार्थिनःसुखम् ॥१३१॥

**अर्थ.**—जो देहाला किमपिहि श्रम होऊं नये अशी इच्छा करितो तो विद्येतें टाकितो, जो विद्येतें इच्छितो तो सुखातें त्यागितो, सुखाची इच्छा करणारास विद्या कोठून प्राप्त होईल? आणि विद्या इच्छिणारास सुख कोठून प्राप्त होईल. **तात्पर्य.**—विद्याभ्यास करणारास सुख मिळत नाहीं.

अहिंनृपंचशार्दूलं बृटिंचबालकंतथा ॥
परश्वानंचमूर्खंच सप्तसुप्तान्नबोधयेत् ॥ १३२ ॥

**अर्थ.**—सर्प, राजा, वाघ, बृटि नांवाचा जीव विशेष, बालक, दुसऱ्याचें श्वान, आणि मुर्ख हे सात निद्रिस्थ असतां यांतें जागृत करूं नये. **तात्पर्य.**—पर दुःख जे जाणत नाहींत त्यांस जागृत केल्यापासून दुःख प्राप्त होतें.

विद्यार्थीसेवकःपांथः क्षुधार्तोभयकातरः ॥
भांडारीप्रतिहारीच सप्तसुप्तान्प्रबोधयेत् ॥ १३३ ॥

**अर्थ.**—विद्यार्थी, चाकर, मार्गस्थ, क्षुधार्थ, भयाभीत, धनादिकांचा रक्षक, आणि द्वारपाळ हे सात निद्रिस्थ असतां जागृत करावे. **तात्पर्य.**—ज्यांस जागृत केल्यापासून हितावह आहे अशांस उठविल्याचा दोष नाहीं.

असंतुष्टाद्विजानष्टाः संतुष्टाश्चमहीभृतः ॥
सलज्जागणिकानष्टा निर्लज्जाश्चकुलांगनाः ॥१३४॥

**अर्थ.**—ज्याला कधींहि किती द्रव्य मिळालें असतां संतोष मानीत नाहींत ते ब्राह्मण, अल्प द्रव्यानें संतोष पावणारा राजा, लज्जायुक्त कलावंिण, आणि लग्न झालेल्या स्त्रिया ज्या अमर्याद भाषण करणाऱ्या, अशीं हीं नष्टच जाणावीं. **तात्पर्य.**—कर्तव्यकर्माप्रमाणें न चालणें हें मनुष्यास लांछन होय.

नदेवोविद्यतेकाष्ठे नपाषाणेनमृन्मये ॥
भावेहिविद्यतेदेव स्तस्माद्भावोहिकारणम् ॥ १३५ ॥

**अर्थ.**—काष्ट, पाषाण, आणि मृत्तिका, यांचे प्रतिमेचे ठायीं देव राह-तो असेंहि नाहीं तर एक भक्तीच्या ठायीं देव राहतो तस्मात ईश्वरप्राप्ति-विषयीं एक भक्तीच असली पाहिजे. **तात्पर्य.**—विश्वास हा फलद्रूप होतो.

वृद्धकालेमृताभार्या बंधुहस्तगतंधनम् ॥
भोजनंचपराधीनं तिस्रःपुंसांविडंबनाः ॥ १३६ ॥

**अर्थ.**—वृद्धापकाळीं स्त्री मृत्यु पावली असतां, द्रव्य बंधुच्या (परक्याच्या) हस्तगत झालें असतां, आणि भोजन दुसऱ्याच्या आधीन, ह्या तीन प्रका-रच्या पुरुषास विडंबना होत. **तात्पर्य.**—वृद्धापकाळीं पराधीनता महा दुःखकारक होय.

इक्षुरापःपयोमूलं तांबूलंफलमौषधम् ॥
भक्षयित्वापिकर्तव्याः स्नानदानादिकाःक्रियाः ॥१३७॥

**अर्थ.**—ऊंस, उदक, दुग्ध, मूल ह्मणजे कंद, तांबूल, फल, आणि औषध हे पदार्थ भक्षण करूनहि स्नानदानादि कर्मे केल्यास दोष नाहीं. **तात्पर्य.**—धान्याहाराशिवाय वस्तु स्नानाआधि भक्षण करण्यास दोष नाहीं.

संतोषस्त्रिषुकर्तव्यः स्वदारेभोजनेधने ॥
त्रिषुचैवनकर्तव्योऽध्ययनेतपदानयोः ॥ १३९ ॥

**अर्थ.**—स्त्री आणि भोजन तरीच द्रव्य या तिहींचे ठायीं निरंतर संतोष असावा; दान, अध्ययन, आणि तप, यांचे ठिकाणीं कधींहि तृप्ति नसावी. तात्पर्य.—चांगल्या कर्माविषयीं तृप्ति नसावी.

अर्थनाशंमनस्तापं गृहिणीचरितानिच ॥
नीचवाक्यंचापमानं मतिमान्नप्रकाशयेत् ॥ १४० ॥

**अर्थ.**—द्रव्याचा नाश, मनांतील संताप, आपल्या स्त्रीचें आचरण, नीच जर आपणास दुर्भाषण बोलला तर, आणि कोणीं अपमान केला तर, बुद्धिमंतानें लोकांत प्रसिद्धीस आणूं नये. **तात्पर्य.**—आपली आपण न्यूनता प्रसिद्ध केल्यापासून लघुत्व प्राप्त होतें.

लुब्धमर्थेनगृण्हीयात् स्तब्धमंजलिकर्मणा ॥
मुर्खंछंदानुवृत्याच यथार्थत्वेनपंडितम् ॥ १४१ ॥

**अर्थ.**—आपला शत्रू जर बलवान् लोभी आहे तर त्याला द्रव्येंकरून वश करावा, जो स्तब्ध ह्मणजे अहंकारेंकरून मोठा गर्विष्ट त्याला कर जोडून नम्रतेनें वश करावा, जो मूर्ख त्याला वश करणें तर त्याचे मर्जी-प्रमाणें वर्तून आपलासा करावा, जो पंडित आहे त्याला वश करणें तो यथार्थ भाषणें करून करावा; कांकीं, ज्ञात्याला मिथ्या भाषण रुचत नाहीं. **तात्पर्य.**—जें ज्यास रुचतें तें दिल्यानें कार्यसिद्धी सत्वर होते."

ऋणकर्तापिताशत्रु र्माताचव्यभिचारिणी ॥
भार्यारूपवतीशत्रुः पुत्रःशत्रुरपंडितः ॥ १४२ ॥

**अर्थ.**—जो पिता पुत्रास ऋण करून ठेवितो तो शत्रु जाणावा, माता

पुत्राचे परम दैवत असून जर ती व्यभिचारिणी आहे तर शत्रु जाणावी जी स्त्री परम सुंदर रूपवती ती शत्रु सारिखीच समजावी; का की, सौंदर्यामुळे तिजवर सर्व पुरुष सकाम अवलोकन करून मोहित करतात नंतर ती कुलदोषणीय होते ह्मणून ती शत्रु, जो अविद्वान पुत्र तो पित्याने आपला शत्रु समजावा, का की, तो अविद्वत्तेमुळे आपणास दूषण लावितो. तात्पर्य.—हीनत्व आणणारे आपले शत्रु होत.

अधनाधनमिच्छंति वाचंचैवचतुष्पदः ॥
मानवास्वर्गमिच्छंति मोक्षमिच्छंतिदेवताः ॥ १४३ ॥

अर्थ.—जे द्रव्यहीन ते द्रव्याची इच्छा करितात, ज्यास वाचा नाहीं ते वाणीची इच्छा करितात, मनुष्ये स्वर्गाची इच्छा करितात, देव मोक्ष इच्छिताते. तात्पर्य.—जी वस्तु ज्याला अप्राप्य असते तिची तो इच्छा करितो.

वृथावृष्टिःसमुद्रेषु वृथातृप्तेषुभोजनं ॥
वृथादानंधनाढ्येषु वृथादीपोदिवापिच ॥ १४४ ॥

अर्थ.—समुद्रामध्ये पर्जन्य वृष्टि व्यर्थ कां की तेथे तिचा उपयोग नाहीं, जे तृप्त दुसऱ्याचे अन्नाची इच्छा करित नाहींत त्यांस भोजन देणे व्यर्थ जाणावे, जे धनाढ्य त्यांस दान देणे व्यर्थ, कारण कीं त्यांस द्रव्याची आशा नाहीं, दिवसाचे ठायीं दीप निरुपयोगी कां कीं, तो आपला प्रकाश करण्यास सूर्याचे तेजापुढे समर्थ होत नाहीं. तात्पर्य.—ज्या वस्तुपासून ज्याला उपयोग नाहीं ती त्यास देणे व्यर्थ जाणावे.

जन्ममृत्यूहियात्येको भुंजत्येकःशुभाशुभं ॥
नरकेषुपतत्येको ह्येकोयातिपरांगतिं ॥ १४५ ॥

अर्थ.—जन्म एकच पावतो, मृत्युहि एकच पावतो, पुण्यफलाते अथवा पापफलाते एकच भोगितो, नरकाचे ठायीं एकच पतन पावतो, मोक्षासहि एकटाच गमन करितो, तस्मात् कोणत्याहि कर्माविषयीं कोणीच कोणाला सहाय नाहीं. तात्पर्य.—जो जे कर्म करितो तोच त्याचे फळ भोगितो.

नास्तिकामसमोव्याधि र्नास्तिमोहसमोरिपुः ॥
नास्तिक्रोधसमोवन्हि र्नास्तिज्ञानात्परंसुखं ॥ १४६ ॥

**अर्थ.**—कामासारखा दुसरा व्याधि नाहीं, मोहासारखा सर्व घातक दुसरा शत्रु नाहीं, क्रोधासारखा दाहक इतर अग्नि नाहीं, ज्ञानासारखें सुखकारक इतर कांहींच नाहीं. **तात्पर्य.**—ज्ञानासारखें दुसरें सौख्य नाहीं.

**मूर्खानांपंडिताद्वेष्या अधनानांमहाधनाः ॥**
**परांगनाकुलस्त्रीणां सुभगानांचदुर्भगाः ॥ १४७ ॥**

**अर्थ.**—मूर्ख पंडिताचा, दरिद्री धनवंताचा, व्यभिचारिणी पतिव्रतेचा, आणि विधवा स्त्रिया सौभाग्यवतीचा द्वेष करितात. **तात्पर्य.**—वाईटास चांगलें सहन होत नाहीं.

**राजपत्नीगुरोःपत्नी मित्रपत्नीतथैवच ॥**
**पत्नीमातास्वमाताच पंचैतामातरःस्मृताः ॥ १४८ ॥**

**अर्थ.**—राजाची, गुरुची, व मित्राची स्त्री, आपल्या स्त्रीची माता, आणि आपली माता ह्या पांच माता जाणाव्या. **तात्पर्य.**—जे आपले हितकर्ते आहेत त्यांच्या स्त्रीया मातेसमान जाणाव्या.

**जनिताचोपनीताच यस्तुविद्यांप्रयच्छति ॥**
**अन्नदाताभयत्राता पंचैतेपितरःस्मृताः ॥ १४९ ॥**

**अर्थ.**—जनिता ह्मणजे उत्पन्न करणारा, उपनिता ह्मणजे मौंजीबंधन करणारा, जो विद्या पढवितो तो, जो अन्न देतो तो, आणि भयापासून रक्षितो तो, हे पांच पितरच जाणावे. **तात्पर्य.**—अस्तित्वांत आणणारा पिता जाणावा.

**कःकालःकानिमित्राणि कोदेशःकोव्ययागमौ ॥**
**कस्याहंकाचमेशक्ति रितिचिंत्यंमुहुर्मुहुः ॥ १५० ॥**

**अर्थ.**—काल कोणता? जो कर्माविषयीं प्रशस्त प्रातरादिक तो काल ह्मणावा; मित्र कोणते? जे निरापेक्ष कार्य करणारे ते; देश कोणता? ज्या देशीं भय नाहीं तो; व्यय ह्मणजे खर्च किती? आणि आगम ह्मणजे प्राप्ति किती? मी कोणाचा? माझी शक्ति किती? या प्रकारें वारंवार विचार करावा. **तात्पर्य.**—पूर्ण विचार करून केलेल्या कार्यापासून सहसा दुःख प्राप्त होत नाहीं; आणि झाल्यास त्याचा पश्चाताप वाटत नाहीं.

अध्वाजरामनुष्याणां वाजिनांबधनंजरा ॥
अमैथुनंजरास्त्रीणां वस्त्राणामातपोजरा ॥ १५१ ॥

अर्थ.—सर्व काल मार्ग चालण्याच्या योगेंकरून मनुष्यास जरा होते, घोड्यांना बंधनानें जरा प्राप्त होते, मैथुनावांचून स्त्रियांना जरा लवकर प्राप्त होते, वस्त्रें उष्णामध्यें निरंतर वाळविलीं असतां तीं लवकर जीर्ण होतात. तात्पर्य.—तापानें जरा प्राप्त होते.

त्यजेद्धर्मंदयाहीनं विद्याहीनंगुरुंत्यजेत् ॥
त्यजेत्क्रोधमुखींभार्यां निस्नेहान्बांधवांस्त्यजेत् ॥१५

अर्थ.—जो धर्मेंकरून व दयेंकरून हीन त्याचा त्याग करावा, विद्याहीन गुरूचा त्याग करावा, सर्व काल क्रोधयुक्त जिचें मुख त्या स्त्रीचा त्याग करावा, ज्यांना स्नेह नाहीं त्या बांधवाचा त्याग करावा. तात्पर्य.—ज्या पासवांपासून सुख होत नाहीं अशांचा त्याग करावा.

अनभ्यासेविषंशास्त्रं मजीर्णेभोजनंविषं ॥
दरिद्रस्यविषंगोष्ठी वृद्धस्यतरुणीविषं ॥ १५३ ॥

अर्थ.—ज्याला अभ्यास नाहीं त्याला शास्त्र सुलभ असतां विषासारिखें दुस्तर वाटतें, पूर्वीं भोजन केलेलें अन्न पचन न झालें असतां त्यावर पुनर्भोजन विषासारखें मारक होय, दरिद्र्यास गोष्टी विषासारख्या रुचत नाहींत कारण तो दरिद्रपणामुळें सर्वकाळ चिंताग्रस्त असतो, वृद्ध पुरुषाला तरुण स्त्री विषासारखी दिसते. तात्पर्य.—ज्याला ज्या विषयाची इच्छा होत नाहीं त्याला तो विषय विषासारिखा दुस्पर्श वाटतो.

अपुत्रस्यगृहंशून्यं दिशःशून्यास्त्वबांधवाः ॥
मूर्खस्यहृदयंशून्यं सर्वशून्यंदरिद्रता ॥ १५४ ॥

अर्थ.—अपुत्राचें गृह शोभत नाहीं, बांधवहीन दिशा शोभत नाहींत, मूर्खाचें हृदय शून्य होय, कारण की, हृदय ज्ञानोत्पत्तिचें स्थळ तें ज्ञान ज्या हृदयांत नाहीं तें हृदय शोभत नाहीं, दरिद्रपणा हा सर्व शून्य जाणावा. तात्पर्य.—दरिद्रासारखें शून्य दुसरें कांहीं नाहीं.

एकाकिनातपोद्वाभ्यां पठनंगायनंत्रिभिः ॥

चतुर्भिर्गमनंक्षेत्रं पंचभिर्बहुभिरणः ॥ १५५ ॥

**अर्थ.**—तपकरणें तें एकानेंच करावें, अध्ययन दोघांनीं करावें, गायन तिघांनीं करावें, कोठेंहि गमन करणें तें चौघांनीं करावें, कृषिकर्म पांचांनीं करावें आणि युद्ध करण्यास फार समुदाय असावा. **तात्पर्य.**—योग्य मार्गानें केलेलें कार्य स्वल्पांत होऊन चांगलें होतें.

यावत्स्वस्थोह्ययंदेहो यावन्मृत्युश्चदूरतः ॥
तावदात्महितंकुर्या त्प्राणांतेकिंकरिष्यति ॥ १५६ ॥

**अर्थ.**—जोंपर्यंत हा देह निरोगी असून स्वाधीन आहे, आणि मृत्यु दूर आहे, तोंपर्यंत मनुष्यानें आत्महित करावें, अंतकाल समीप आल्यावर मग हित कसें होईल? **तात्पर्य.**—स्वहित करून घेण्यास विलंब करूं नये.

मूर्खायत्रनपूज्यंते धान्यंयत्रसुसंचितं ॥
दंपत्योःकलहोनास्ति तत्रश्रीःस्वयमागता ॥ १५७ ॥

**अर्थ.**—ज्या गृहीं मूर्खांचा सत्कार होत नाहीं, धान्य संग्रह निरंतर असतो, आणि स्त्री पुरुषाचा कलह नाहीं, त्या गृहीं लक्ष्मी आपणच येऊन स्थिर राहते. **तात्पर्य.**—कलह हा दरिद्रास कारण होय.

कोतिभारःसमर्थानां किंदूरंव्यवसायिनाम् ॥
कोविदेशःसुविद्यानां कःपरःप्रियवादिनां ॥ १५८ ॥

**अर्थ.**—समर्थास कांहीं एक काम करावयास अशक्य काय आहे? व्यवहार करणारास कोणती वस्तु दूर आहे? विद्वान् पुरुषास कोणता परदेश आहे? आणि प्रिय बोलणारास कोणता शत्रु आहे? **तात्पर्य.**—प्रिय बोलणारास सर्वच प्रिय असतात.

अतिरूपेणवैसीता अतिगर्वेणरावणः ॥
अतिदानंबलिर्दत्वा अतिसर्वत्रवर्जयेत् ॥ १५९ ॥

**अर्थ.**—सीता अति रूपवती होती यास्तव ती रावणानें नेली, रावणासहि गर्व बहुत झाला तेणेंकरून तो नाश पावला, बलीनें गुरु वचन उल्लंघन करून लोकोत्तर दान करिता झाला म्हणूनच तो स्थान भ्रष्ट झाला; याकरितां कोणतेंहि कर्म फार करूं नये करील तो नाश पावेल. **तात्पर्य.**—अति सर्वच वर्ज्य असावें.

अकिंचनस्यदांतस्य शांतस्यसमचेतसः ॥
सदासंतुष्टमनसः सर्वाःसुखमयादिशः ॥ १६० ॥

अर्थ.—निरिच्छ इंद्रियांचे दमन करणारा, शांत, समबुद्धि, आणि सार्वकाळ संतुष्ट मनाचा असा जो आहे त्यास सकळ दिशाच सुखमय आहेत. तात्पर्य.—संतोष हा सुखदायक होय.

उद्योगेनास्तिदारिद्र्यं जपतोनास्तिपातकं ॥
मौनेचकलहोनास्ति नास्तिजागरतोभयं ॥ १६१ ॥

अर्थ.—उद्योग करणाऱ्यास दरिद्रता प्राप्त होत नाहीं, निरंतर भगवन्नाम जपकरणाऱ्यास पातकाची बद्धकता होत नाहीं, मौनधारण करणारास कलहाची बाधा होत नाहीं, जागरण करणाऱ्यास कधींहि भीति प्राप्त होत नाहीं. तात्पर्य.—ज्याचा त्याजवर शमोपाय केल्याने भीति होत नाहीं.

त्यजेदेकंकुलस्यार्थे ग्रामस्यार्थेकुलंत्यजेत् ॥
ग्रामंजनपदस्यार्थे आत्मार्थेपृथिवींत्यजेत् ॥ १६२ ॥

अर्थ.—एक पुरुषाच्या संग्रहाने जर कुलाचा नाश होत आहे तर त्याचा त्याग करून कुलाचे रक्षण करावे, एक कुलाच्या योगाने जर ग्राम नाश पावतो तर ते कुल ग्रामांतून काढून लावावे, आणि ग्राम रक्षावा, एका ग्रामामुळे जर देश उच्छिन्न होतो तर तो ग्राम काढून टाकावा, जर आत्म नाश होत आहे तर पृथ्वी सोडून जावे आणि आत्म रक्षण करावे. तात्पर्य.—एकाकरितां पुष्कळांचे नुकसान करूंनये आणि आत्म्याकरितां सर्वांचा परित्याग करावा.

रूपयौवनसंपन्ना विशालकुलसंभवाः ॥
विद्याहीनानशोभंते निर्गंधाइवकिंशुकाः ॥ १६३ ॥

अर्थ.—रूपाने आणि तारुण्याने संपन्न आहेत तसे श्रेष्ठ कुलोत्पन्न आहेत तथापि ते जर विद्याहीन आहेत तर पुष्पादि संपत्तियुक्त, सुगंधरहित पळसाचे वृक्षासारखे शोभत नाहींत. तात्पर्य.—विद्येशिवाय मनुष्यास शोभा नाहीं.

एतदर्थंकुलीनानां नृपाःकुर्वंतिसंग्रहं ॥
आदिमध्यावसानेषु नत्यजंतिचतेनृपम् ॥ १६४ ॥

**अर्थ.**—दुर्जन फार घातक याजकरितां राजे कुलीनांचा संग्रह करितात, कां कीं ते कालत्रयींहि संग्रह करणाऱ्यांचा त्याग करित नाहींत, धन्यास संकटापासून सर्वदां रक्षितात. **तात्पर्य.**—कुलीन हे समागम करण्यास पात्र होत.

**गृहीत्वादक्षिणांविप्रा स्त्यजंतियजमानकं ॥**
**प्राप्तविद्यागुरुंशिष्या दग्धारण्यंमृगास्तथा ॥ १६५ ॥**

**अर्थ.**—ऋत्वीज ब्राह्मण दक्षिणा घेऊन यजमानातें सोडितात, शिष्य विद्या प्राप्त झाल्यावर गुरुतें सोडितात, दग्धवन सोडून मृग अन्यत्र जातात. **तात्पर्य.**—जें ज्यापासून मिळावयाचें असतें तें मिळे तोंपर्यंतच लोक त्याचे आश्रित असतात.

**सत्कुलेयोजयेत्कन्यां पुत्रंविद्यासुयोजयेत् ॥**
**व्यसनेयोजयेच्छत्रु मिष्टंधर्मेणयोजयेत् ॥ १६६ ॥**

**अर्थ.**—कन्या देणें ती उत्तम कुल पाहून द्यावी, पुत्रास उत्तम प्रकारचे विद्येस निरंतर लावावा, शत्रूतें संकटामध्येंच सदैव पाडावें, आपणास जी प्रिय वस्तु असेल ती पूर्वी धर्माचे ठायीं लावावी. **तात्पर्य.**—उत्तम योजना सुखदायक होय.

**कस्यदोषःकुलेनास्ति व्याधिनाकेनपीडिताः ॥**
**व्यसनंकेननप्राप्तं कस्यसौख्यंनिरंतरम् ॥ १६७ ॥**

**अर्थ.**—या लोकीं दोष रहित कोणाचें कुल आहे ? व्याधीनें पीडित नाहीं असा कोण आहे ? संकट प्राप्त झालें नाहीं असा कोण आहे ? निरंतर सुख कोणास आहे ? दोष व्याधि संकट रहित निरंतर सुखी एक आत्मा आहे. **तात्पर्य.**—या जगतांत सर्व सुखी असा कोणी नाहीं.

**निर्धनंपुरुषंवेश्या प्रजाभग्नंनृपंत्यजेत् ॥**
**खगावीतफलंवृक्षं भुक्त्वाचाभ्यागतागृहं ॥ १६८ ॥**

**अर्थ.**—द्रव्यहीन पुरुषातें वेश्या त्यागिते, पालनादि शक्तिहीन राजातें प्रजा सोडिते, फलहीन वृक्षातें पक्षी सोडितात, ज्या गृहीं भोजन केलें त्याचा अभ्यागत त्याग करून जातात. **तात्पर्य.**—लोभाशिवाय कोणी कोणाचा आश्रय करीत नाहीं.

बलंविद्याचविप्राणो राज्ञांसैन्यबलंतथा ॥
बलंवित्तंचवैश्यानां शूद्राणांचकनिष्ठिका ॥ १६९ ॥

अर्थ.—ब्राह्मणांचें बळ विद्या, राजांचें बळ सैन्य, वैश्यांचें बळ द्रव्य, आणि शूद्रांचें बळ सेवा हीं होत. तात्पर्य.—बळेंकरून जें हीन तें शोभत नाहीं.

नदीतीरेषुयेवृक्षाः परगेहेषुकामिनी ॥
मंत्रिहीनाश्चराजानो शीघ्रंनश्यंत्यसंशयम् ॥ १७० ॥

अर्थ.—नदीच्या तिरींचे वृक्ष, परगृहीं जाणारी तरुण स्त्री, प्रधानावांचून राजा हीं लवकर नाश पावतात. तात्पर्य.—ज्यांचा पाया शुद्ध नाहीं ते लौकर नाश पावतात.

श्लोकेनवातदर्धेन तदर्धार्धाक्षरेणच ॥
अवंध्यंदिवसंकुर्या द्दानाध्ययनकर्मभिः ॥ १७१ ॥

अर्थ.—एक श्लोक किंवा अर्धा श्लोक अथवा एक पाद शेवटीं.एक अक्षर तरीं प्रतिदिवशीं पढावें, तशींच दान अध्ययनादि कर्मे करीत जावीत. दिवस व्यर्थ घालवूं नये, ज्या दिवशीं कोणताच चांगला उद्योग केला नाहीं तो दिवस वंध्य याकरितां कांहीं तरी चांगला उद्योग करावा. तात्पर्य.—नियमानें महत्कार्यहि अल्प श्रमांत होतें.

कष्टंचखलुमूर्खत्वं कष्टंचखलुयौवनं ॥
कष्टात्कष्टतरंचैव परगेहनिवासनम् ॥ १७२ ॥

अर्थ.—मूर्खपणा महादुःखदायक होय, तारुण्यहि तसेंच दुःखकारक आहे; कां कीं, तें रक्षावयाचें परम दुर्घट आहे. या दोहींपेक्षां दुसऱ्याचे घरीं राहणें हें तर फारच दुःख होय. तात्पर्य.—दुसऱ्याचे येथें राहण्यासारखें दुःख नाहीं.

मनसाचिंतितंकार्यं वाचानैवप्रकाशयेत् ॥
मंत्रेणरक्षयेद्गूढं कार्यंचापिनियोजयेत् ॥ १७३ ॥

अर्थ.—मनेंकरून निश्चय केलेलें जें कार्य तें वाणीकरून प्रसिद्ध करूं नये, मसलतीनें कार्य रक्षावें, आणि त्याची योजना गुप्तपणें करावी, प्र-

सिद्ध करणें तें साहस्यानंतर करावें, पूर्वी केलें असतां कार्य सिद्ध होत नाहीं. तात्पर्य.—कोणतेंहि कार्य सिद्ध झाल्या वांचून प्रसिद्ध करूंनये.

तेपुत्रायेपितुर्भक्ताः सपितायस्तुपोषकः ॥
तन्मित्रंयत्रविश्वासः साभार्यायत्रनिर्वृतः ॥ १७४ ॥

**अर्थ.**—जे पित्याचे भक्त ह्मणजे त्याचे इच्छेप्रमाणें सेवा करणारे तेच पुत्र ह्मणावे; आणि आपणास यांपासून पुढें सुख होईल अशी इच्छा न धरितां पुत्रांचें पोषण जो करितो तोच पिता; ज्यावर निःकपट विश्वास तोच मित्र, आणि जिच्या संगें सुख होतें तीच भार्या जाणावी. **तात्पर्य.**—निष्काम भक्तीनें भजणें हीच खरी सेवा होय.

यस्यपुत्रोवशीभूतो भार्याछंदानुगामिनी ॥
विभवेयश्चसंतुष्ट स्तस्यस्वर्गइहैवहि ॥ १७५ ॥

**अर्थ.**—पुत्र ज्याच्या स्वाधीन, आणि स्त्री इच्छेप्रमाणें वर्तणारी, आणि ऐश्वर्याच्या ठायीं जो सदा संतुष्ट त्याला इहलोकींच स्वर्गीचें सुख आहे. **तात्पर्य.**—स्वगृहीं सर्व अनुकूलता हें स्वर्ग सुखासारखें होय.

भोज्यभोजनशक्तिश्च रतिशक्तिर्वरांगना ॥
विभवेदानशक्तिश्च तस्यस्वर्गइहैवहि ॥ १७६ ॥

**अर्थ.**—भोजनीय पदार्थ अनुकूल असतां भोजनाची शक्ति असणें, उत्कृष्ठ स्त्री मिळाली असतां रतिशक्ति असणें, ऐश्वर्य प्राप्त असतां दानशक्ति असणें हीं ज्यास अनुकूल आहेत त्यास या लोकींच स्वर्गासमान सुख जाणावें. **तात्पर्य.**— कोणतीहि गोष्ट अनुकूल असून तिचा उपभोग घेण्याची शक्ति असणें हें महत् भाग्य होय.

विषादप्यमृतंग्राह्य ममेध्यादपिकांचनं ॥
नीचादप्युत्तमांविद्यां स्त्रीरत्नंदुष्कुलादपि ॥ १७७ ॥

**अर्थ.**—विषापासूनहि शोधून अमृत घ्यावें, अमंगळांत सुवर्ण पडलें असतां तेंहि क्षालनादि करून घ्यावें, उत्तम विद्या नीचापासूनहि घ्यावी, तशीच कन्या सर्व गुण संपन्न आहे तर दुष्ट कुलापासूनहि वरावी. आपण अमंगळांतील वस्तु किंवा दुष्ट कुलांतील कन्या हें पाहूं नये. **तात्पर्य.**—चांगले गुण हे नीचापासूनहि घेण्यास दोष नाहीं.

नदीनांचनखीनांच शृंगिणांशस्त्रपाणिनां ॥
विश्वासोनैवकर्त्तव्यः स्त्रीषुराजकुलेषुच ॥ १७८ ॥

**अर्थ.**—नदी, तिखट नखांचीं जनावरें, शिंगांचे पशु, निरंतर शस्त्र हातीं धरणारे, स्त्रिया आणि राजकुलांचा विश्वास कदापि धरूं नये. **तात्पर्य.**—शस्त्रधाऱ्यांचा विश्वास घातक होय.

आतुरेव्यसनेप्राप्ते दुर्भिक्षेशत्रुसंकटे ॥
राजद्वारेस्मशानेच यस्तिष्ठतिसबांधवः ॥ १७९ ॥

**अर्थ.**—रोगग्रस्त काळीं, दुःखसमयीं, धान्यापत्तिचे वेळेस, शत्रु संकट काळीं, राजाचे गृहीं, आणि स्मशानांत इतक्या ठिकाणीं जो आपणास न सोडितां राहतो तोच बांधव जाणावा. **तात्पर्य.**—सुख दुःखकाळीं समान वागणारेच बांधव जाणावे.

जानीयात्प्रेषणेभृत्यान् बांधवान्व्यसनागमे ॥
मित्रंचापत्तिकालेषु भार्यांचविभवक्षये ॥ १८० ॥

**अर्थ.**—जोंपर्यंत कोणतेहि कामाविषयीं सेवकास आज्ञा केली नाहीं तोंपर्यंत सेवकाची परीक्षा होत नाहीं, आज्ञासमयीं ते कसे आहेत तें जाणावें, काहीं दुःख प्राप्तिकाळीं आपले बांधव आपणांस अनुकूल आहेत किंवा नाहींत तें त्यावेळेस जाणावें, जे आपले पूर्वीचे मित्र होते ते कोणेक आपत्तिकालीं कसें आहेत तें जाणावें, जेथपर्यंत ऐश्वर्य असतें तेथपर्यंत स्त्री पुरुषाचे आज्ञेत राहतेच, परंतु ऐश्वर्य क्षय झाला ह्मणजे त्याकाळीं तिची परीक्षा जाणावी. **तात्पर्य.**—प्रसंगाशिवाय परीक्षा समजत नाहीं.

धनिकःश्रोत्रियोराजा नदीवैद्यस्तुपंचमः ॥
पंचयत्रनविद्यंते नतत्रदिवसंवसेत् ॥ १८१ ॥

**अर्थ.**—ज्या गांवांत धनवान्, श्रोत्रिय ब्राह्मण, राजा, नदी वैद्य, हे पांच नाहींत तेथें एक दिवसहि राहूंनये. अशा स्थळीं जो राहील तो सुख पावणार नाहीं. **तात्पर्य.**—कुग्रामवास महा दुःखदायक होय.

आपदर्थेधनंरक्षे दारानरक्षेद्धनैरपि ॥
आत्मानंसततंरक्षे दारैरपिधनैरपि ॥ १८२ ॥

**अर्थ.**—पुढें आपत्ति प्राप्त होईल यासाठीं धनाचें रक्षण करावें. जर स्त्री नाश होत आहे तर लोभ न धरितां धनेंकरूनहि स्त्रिया रक्षाव्या; आणि जर आपला नाश होत आहे तर द्रव्य आणि स्त्रिया इहींकरून आत्मरक्षण करावें. **तात्पर्य.**—पाहिजे तें देऊन आपल्या प्राणाचें रक्षण करावें.

**हरेःपदाहतिःश्लाघ्या नश्लाघ्यंखररोहणं ॥**
**स्पर्धापिविदुषायुक्ता नयुक्तामूर्खमित्रता ॥ १८३ ॥**

**अर्थ.**—अश्वाच्या पायानें ताडन झालें तरी तें श्रेष्ठ आहे परंतु गर्दभावर आरोहण योग्य नाहीं; यास दृष्टांत विद्वानांशीं स्पर्धा घडली तरी योग्य जाणावी, परंतु मूर्खांशीं मैत्री बरोबर नाहीं. **तात्पर्य.**—विद्वान शत्रूपासून जो लाभ होतो तो मूर्ख मित्रापासून होत नाहीं.

**तावन्महत्वंपांडित्यं कुलीनत्वंविवेकता ॥**
**यावज्ज्वलतिनांगेषु स्वतःपंचेषुपावकः ॥ १८४ ॥**

**अर्थ.**—पुरुषाचे ठायीं तोंपर्यंतच पूज्यत्व, ज्ञानविचार, कुलीनपणा, आणि सारासार अवलोकन करणें हीं सर्व राहतात; जोंपर्यंत मदनाग्नि स्वयें देहामध्यें प्रदीप्त होत नाहीं तो प्रदीप्त झाला असतां महत्वादिकांचा नाश होतो. **तात्पर्य.**—जोंपर्यंत कोणताहि प्रसंग प्राप्त झाला नाहीं तोंपर्यंतच सर्व गोष्टी सुचतात.

**क्षमाबलमशक्तानां शक्तानांभूषणंक्षमा ॥**
**क्षमावशीकृतिर्लोके क्षमयाकिंनसिध्यति ॥ १८५ ॥**

**अर्थ.**—अशक्त पुरुषास क्षमाच बल आहे, आणि शक्तास क्षमा भूषणरूप आहे, क्षमा लोकांत सर्वांस वश करिते, व क्षमेनें काय सिद्ध होत नाहीं! **तात्पर्य.**—क्षमेनें सर्व सिद्ध होतें.

**पंचमेहनिषष्ठेवा शाकंपचतिस्वगृहे ॥**
**अनृणीचाप्रवासीच सवारिचरमोदते ॥ १८६ ॥**

**अर्थ.**—पांचवे अथवा सहावे दिवशीं शाकपत्रादिक पचन करून आपले घरीं ऋणरहित व प्रवासरहित जो पुरुष निर्वाह करितो तो जलचरासारखा आनंदांत असतो. **तात्पर्य.**—प्रवास आणि कर्ज नसून स्वगृहीं अल्पाहार जरी मिळाला तरी तो सुखी जाणावा.

गुरुशुश्रूषयाविद्या पुष्कलेनधनेनवा ॥
अथवाविद्ययाविद्या चतुर्थनोपलभ्यते ॥ १८७ ॥

**अर्थ.**—गुरूच्या सेवेकरून, अथवा पुष्कळ धन देऊन, किंवा आपली विद्या सांगून, दुसऱ्याची विद्या घ्यावी. या तीन उपायांवांचून चौथ्या प्रकारानें विद्या प्राप्त होत नाहीं. **तात्पर्य.**—गुरूच्या इच्छेप्रमाणें वर्तन केल्याशिवाय विद्या प्राप्त होत नाहीं.

लोभमूलानिपापानि व्याधयोरसमूलकाः ॥
स्नेहमूलानिदुःखानि त्रयंत्यक्त्वासुखीभवेत् ॥ १८८॥

**अर्थ.**—पापाचें मूळ लोभ, रोगाचें मूळ आवडेल तें खाणें, दुःखाचें मूळ स्नेह होय, तस्मात् हीं तीन ज्याणें सोडिलीं तो सुखी होतो. **तात्पर्य.**—पाप, रोग, आणि दुःख यांचें मूळ छेदणारा सुखी होय.

उदारस्यतृणंवित्तं शूरस्यमरणंतृणम् ॥
विरक्तस्यतृणंभार्या निस्पृहस्यतृणंजगत् ॥ १८९ ॥

**अर्थ.**—उदार पुरूषास द्रव्य, शूरास मरण, विरक्तास स्त्री, आणि निस्पृहास सर्व जग तृणाचे परी तुच्छ वाटतें. **तात्पर्य.**—निस्पृहास सर्व तुच्छ होय.

मातायदिविषंदद्यात् विक्रीणातिपितासुतम् ॥
राजाहरतिसर्वस्वं तत्रकापरिदेवना ॥ १९० ॥

**अर्थ.**—जर का आईच विष देईल, अथवा बापच पुत्रास विकील, किंवा राजाच सर्वस्व हरील तर तेथें कोणाचा उपाय चालणार आहे? **तात्पर्य.**—जे ज्याच्या स्वाधीन आहे तोच त्याचा नाश करूं लागल्यास दुसरें कोणाचें तेथें चालणार नाहीं.

अस्थिरंजीवितंलोके अस्थिरेधनयौवने ॥
अस्थिराःपुत्रदाराश्च धर्मःकीर्तिर्द्वयंस्थिरं ॥ १९१ ॥

**अर्थ.**—मृत्युलोकीं आयुष्य अशाश्वत आहे तशीच धन, तारुण्य, पुत्र, आणि स्त्रिया हीं क्षणिक होत. धर्म आणि कीर्ति हीं दोनच शाश्वत जाणावीं. **तात्पर्य.**—जें शाश्वत तें संपादावें.

वेश्याऽसौमदनज्वाला रूपेंधनसमेधिता ॥
कामिभिर्यत्रहूयंते योवनानिधनानिच ॥ १९२ ॥

**अर्थ.**—वारांगना हीच कोणी एक मदनाची ज्वाला होय; ती सौंदर्य रुपि काष्टांनीं प्रज्वलित झाली असतां तिच्याठायीं कामी पुरुष आपल्या तारुण्याची आणि धनाची आहुती देतात. **तात्पर्य.**—धन आणि तारुण्य यांचा नाश करण्यास वेश्येसारखा दुसरा अग्नि नाहीं.

क्षमाशस्त्रंकरेयस्य दुर्जनःकिंकरिष्यति ॥
अतृणेपतितोवन्हिः स्वयमेवोपशाम्यति ॥ १९३ ॥

**अर्थ.**—हातामध्यें क्षमारूपी शस्त्र असतां दुर्जन काय करणार आहे? "तृणशून्य प्रदेशावर अग्नि पडला असतां तो आपोआप विझून जातो." **तात्पर्य.**—नम्रपणानें शत्रूहि वश होतो.

अल्पानामपिवस्तूनां संहतिःकार्यसाधिका ॥
तृणैर्गुणत्वमापन्नै र्बध्यंतेमत्तदंतिनः ॥ १९४ ॥

**अर्थ.**—अल्प वस्तु असल्या तथापि त्यांच्या समुदायानें महत्कार्य होतें. तृणाची दोरी केली असतां त्याच्या योगानें मदोन्मत्त गज बांधले जातात. **तात्पर्य.**—क्षुल्लक वस्तूंच्या समुदायांनींहि महत्कार्यें होतात.

चत्वारोधनदायादा धर्माग्निनृपतस्कराः ॥
तेषांज्येष्ठावमानेन त्रयःकुप्यंतिबांधवाः ॥ १९५ ॥

**अर्थ.**—धर्म, अग्नि, राजा आणि चोर हे चौघे द्रव्याचे दायाद होत यांपैकीं ज्येष्ठ जो धर्म त्याचा अपमान केला असतां दुसरे तीन क्षुब्ध होतात. **तात्पर्य.**—जेथें धर्म होत नाहीं तेथें चोरादिकांचें प्राबल्य असतें.

हस्तादपिनदातव्या गृहादपिनदीयते ॥
परोपकरणार्थाय वचनेकिंदरिद्रता ॥ १९६ ॥

**अर्थ.**—यद्यपि स्वहस्तानें याचकांस दान करवत नाहीं, आणि गृहांतूनहि कोणाकडून देववत नाहीं, तर हीं एक गोष्ट असो परंतु परोपकारार्थ आपलें वचन जर उपयोगीं पडत असेल तर त्याविषयीं दरिद्रता करणें हें काय? तर हें अनुचित आहे. **तात्पर्य.**—आपल्या वचनापासून दुसऱ्याचें हित होत असल्यास आळस करूं नये.

सुलभंवस्तुसर्वस्य नयात्यादरणीयतां ॥
स्वदारपरिहारेण परदारार्थिनोजनाः ॥ १९७ ॥

**अर्थ.**—लोकांत जी वस्तु सुलभ असते तिजविषयीं सर्व लोकांच्या अंत:करणांत अति आदर असत नाहीं. यास दृष्टांत असा कीं, प्राय: लोक स्वस्त्रीचा त्याग करून परस्त्रीची इच्छा करीत असतात. **तात्पर्य.**—सुलभ वस्तूवर प्रीति नसते.

धंन्याद्विजमयीनौका विपरीताभवार्णवे ॥
तरंत्यधोगताःसर्वे उपरिस्थाःपतंत्यधः ॥ १९८ ॥

**अर्थ.**—जशी समुद्र तरून जाण्याकरितां काष्टरूप नौका असते, त्याप्रकारेंच या भवसमुद्रातें तरून जाण्याकरितां ब्राह्मणरूप तारण्याविषयीं समर्थ नौका आहे, ती काष्ट नौकेहून विपरीत आहे, ती कशी ह्मणाल तर सांगतों, काष्ट नौकेच्या अधोभागीं बसतात ते बुडतात, जे उर्ध्वभागीं असतात ते तरतात, आणि ब्राह्मणरूप नौकेंत जे अधोभागीं बसतात ते तरतात आणि जे उपरिस्थ होतात ते बुडतात. **तात्पर्य.**—ब्राह्मणाविषयीं जे नम्र ते तरतात, आणि जे अनम्र ते बुडतात.

यदीच्छसिवशीकर्तुं जगदेकेनकर्मणा ॥
परापंचदशास्येभ्यो गांचरंतींनिवारय ॥ १९९ ॥

**अर्थ.**—हे पुरुषा तूं जर एकाच कर्मे करून सकळ जगातें वश करूं इच्छितोस तर पूर्वी दशेंद्रियें आणि शब्दादि पंच विषय यांच्या मुखांपासून त्यांच्या पुढे जाणारें जे गो ह्मणजे मन यातें प्रथम निवारण कर ह्मणजे तुला सर्व-जग वश होईल. **तात्पर्य.**—इंद्रिय स्वाधीन असणारा जगमान्य होतो.

दूरस्थोपिनदूरस्थो योयस्यमनसिस्थितः ॥
योयस्यहृदयेनास्ति समीपस्थोऽपिदूरतः ॥ २०० ॥

**अर्थ.**—जो स्नेहें करून ज्याचें मनामध्यें निरंतर चिंतन करितो तो पुरुष चिंतन करणाऱ्यापासून दूर असतांहि समीपच आहे, आणि जो ज्याचें कधींहि स्नेहानें मनांत स्मरण करीत नाहीं तो त्याच्या जवळ असून दूरच आहे. **तात्पर्य.**—ज्याचा ज्यास निदिध्यास असतो तो त्याच्या जवळच आहे असें जाणावें.

दह्यमानाःसुतीव्रेण नीचाःपरयशोग्निना ॥
अशक्तास्तत्पदंगंतुं ततोनिंदांप्रकुर्वते ॥ २०१ ॥

अर्थ.—नीच लोक दुसऱ्याच्या दुःसह यशरूप अग्नि करून निरंतर संताप युक्त होतसाते त्याच्या योग्यतेप्रत जाऊं इच्छितात, परंतु पावावया-करितां असमर्थ असतां निंदा मात्र करितात. तात्पर्य.—नीच हे बहुधा समर्थांची निंदा करितात.

विनयंराजपुत्रेभ्यः पंडितेभ्यःसुभाषितम् ॥
अनृतंद्यूतकारेभ्यः स्त्रीभ्यःशिक्षेतकैतवम् ॥ २०२ ॥

अर्थ.—नम्रता कोणाप्रत कशी धरावी ती राजपुत्रांपासुन शिकावी, कांकी त्याला बाळपणापासून अभ्यास ठेविलेला असतो, सुभाषित भाषण पंडितापासूनच शिकावें, जे द्यूत करणारे त्यांपासून अनृत भाषण कसें बोलावें तें शिकावें, कपट कसें करावें तें कुलटा स्त्रियांपासुन शिकावें. तात्पर्य.—ज्या कामांत जो निपूण तें काम त्यापासूनच शिकावें.

रंकंकरोतिराजानं राजानंरंकमेवच ॥
धनिनंनिर्धनंचैव निर्धनंधनिनंतथा ॥ २०३ ॥

अर्थ.—ईश्वर जर कृपा करील तर दरिद्यास राज्य देईल, आणि तो जर कोपेल तर राजास दरिद्री करील, तसाच क्षणांत धनवंतास निर्धन करील, आणि निर्धनास धनाढ्य करील. तात्पर्य.—ईश्वर करील तें होणार आहे.

कवयःकिन्नपश्यंति किंनकुर्वंतियोषितः ॥
मद्यपाःकिंनजल्पंति किंनभक्षंतिवायसाः ॥ २०४ ॥

अर्थ.—कवी ज्ञानें करून काय पहात नाहींत? सर्व पहातात; स्त्रि-या न करितील असें काय आहे? त्या साहसपणानें सर्व कांहीं करितील; मद्यपान करणारे न बोलतील असें भाषण कोणतेंच नाहीं, सर्व बोलतील; तसेंच काक भक्षण न करितील असा पदार्थ कोणताहि नाहीं, ते अमं-गळादिकाहि भक्षितात तात्पर्य.—ज्या कर्माचा ज्याला विधीनिषेध नाहीं तें कर्म करण्यास त्याला विचार नसतो.

दृष्टिपूतंन्यसेत्पादं वस्त्रपूतंपिबेज्जलम् ॥
शास्त्रपूतंवदेद्वाक्यं मनःपूतंसमाचरेत् ॥ २०५ ॥

**अर्थ.**—दृष्टीनें पवित्र स्थळ पाहून तेथें चरण ठेवावा, वस्त्रानें गाळलेलें उदक प्राशन करावें, शास्त्रानें जें शुद्ध सांगितलें तेंच वाक्य बोलावें, मनानें पवित्र अपवित्राचा विचार करून जें पवित्र असेल तेंच आचरावें. तात्पर्य.—सारासार विचार पाहून तदनुसार वर्तन करीत असावें.

क्रोधोवैवस्वतोराजा तृष्णावैतरणीनदी ॥
विद्याकामदुघाधेनुः संतोषोनंदनंवनम् ॥ २०६ ॥

**अर्थ.**—क्रोध हाच यमराजा, आशा हीच कोणी एक वैतरणी नदी, विद्या ह्मणजे ज्ञान हीच इच्छित मनोरथ पूर्ण करणारी काम धेनु, आणि संतोष हाच स्वर्ग होय. तात्पर्य.—संतोषासारखें दुसरें सौख्य नाहीं.

शांतितुल्यंतपोनास्ति नसंतोषात्परंसुखं ॥
नतृष्णायाःपरोव्याधि र्नचधर्मोदयापरः ॥ २०७ ॥

**अर्थ.**—शांतिसारखें दुसरें तप नाहीं, संतोषाहून इतर सुख नाहीं, तृष्णेसारखा कोणता व्याधी दुसरा नाहीं व दयेहून श्रेष्ठ दुसरा कोणताहि धर्म नाहीं. तात्पर्य.—सर्व सुखदुःखाचें कारण मन होय.

नात्यंतंसरलैर्भाव्यं गत्वापश्यवनस्थलीम् ॥
छिद्यंतेसरलास्तत्र कुब्जास्तिष्ठंतिपादपाः २०८ ॥

**अर्थ.**—अत्यंत रसाळपणा धरूं नये, पुरुषांनीं कांहीं क्रोधयुक्त असावें, जे फारच सरळ असतात त्यांची अवस्था कशी होते ती वनांत जाऊन पहा, तें काय तर? जे वनांत सरळ वृक्ष असतात त्यांस सर्व लोक तोडितात; आणि जे वांकडे ते तसेंच राहतात. यास्तव लोकांमध्यें कांहीं काळ आपली स्थिति असावी अशी इच्छा असल्यास त्यांनीं किंचित् क्रोध जर धरिला तरच त्यांची लोकांमध्यें स्थिति होईल. तात्पर्य.—प्रपंचांत अत्यंत सरळपणा धरूं नये.

आलस्योपहताविद्या परहस्तगताःस्त्रियः ॥
अल्पबीजंहतंक्षेत्रं हतंसैन्यमनायकम् ॥ २०९ ॥

**अर्थ.**—आळसानें विद्या नाश पावते, स्त्रिया अन्य पुरुषाच्या हस्तगत झाल्या असतां भ्रष्ट होतात, ज्या शेतांत बीज अल्प म्हणजे दळदारपणा नाहीं तें शेत लवकरच नाश पावतें, ज्या सैन्यांत नायक म्हणजे त्याचा निर्वाहक नाहीं तें सैन्य नाश पावतें. **तात्पर्य.**—विपरीत वर्तन नाशास कारण होय.

**तावद्भयेषुभेतव्यं यावद्भयमनागतं ॥**
**आगतंतुभयंदृष्ट्वा प्रहर्तव्यमशंकया ॥ २१० ॥**

**अर्थ.**—जोंपर्यंत भय प्राप्त झालें नाहीं तोंपर्यंत त्याची भीति धरावी आणि तें प्राप्त झाल्यावर त्याची भीति न धरितां युक्तीनें परिहार करावा; तसें न केलें तर आपला नाश होईल. **तात्पर्य.**—आलेला प्रसंग युक्तीनें निवारण करावा.

**उपसर्गेन्यचक्रेच दुर्भिक्षेचभयावहे ॥**
**असाधुजनसंपर्के यःपलायसजीवति ॥ २११ ॥**

**अर्थ.**—पीडा प्राप्त झाली असतां, परचक्र म्हणजे शत्रूंची सेना आपणावर आली असतां, भयंकर दुर्भिक्ष प्राप्त झालें असतां, दुष्ट जनांचा संग प्राप्त झाला असतां इतके समयीं जो पलायन करितो तो वांचतो. **तात्पर्य.**—प्राण हरण्याची वेळ आली असतां पलायन करावें.

**कोकिलानांस्वरोरूपं स्त्रीणांरूपंपतिव्रता ॥**
**विद्यारूपंकुरूपाणां क्षमारूपंतपस्विनां ॥ २१२ ॥**

**अर्थ.**—कोकिलांचें रूप स्वर, त्या स्वरानें सर्वांतें मोहित करतात, स्त्रियांचें रूप एक पातिव्रत्यच होय, कुरूप पुरुषांचें रूप एक विद्या ते त्या विद्येनेंच शोभतात, तपस्व्यांचें रूप क्षमा, ते क्षमेनेंच सर्व जिंकितात. **तात्पर्य.**—उत्तम गुण हेंच सुस्वरूप होय.

**ससिद्धमौषधंधर्मं गृहच्छिद्रंचमैथुनम् ॥**
**कुभुक्तंकुश्रुतंचैव मतिमान्नप्रकाशयेत् ॥ २१३ ॥**

**अर्थ.**—आपणास सिद्ध झालेलें औषध, धर्म, आपल्या घरांतील कोणताहि कमीपणा, मैथुन, आपण जर कदन्न भक्षिलें असेल तर तें, तसेंच जें केवळ निंद्य श्रवण केलें असेल तें बुद्धिमंतानें जनांत प्रसिद्ध करूं नये. **तात्पर्य.**—गूढ प्रसिद्ध केल्यापासून हानि होते.

जलेतैलंखलेगुह्य पात्रेदानंमनागपि ॥
प्राज्ञेशास्त्रंस्वयंयाति विस्तारंवस्तुशक्तितः ॥ २१४ ॥

**अर्थ.**—उदकाचे ठायीं तेल, खल पुरुषाच्या ठायीं गुप्त भाषण, सत्पात्रीं अल्पहि दान, बुद्धिमंताचे ठायीं शास्त्र हीं सर्व पूर्वोक्त स्थळीं अर्पिलीं असतां आधारभूत वस्तूंच्या सामर्थ्यें करून विस्तारास पावतात. **तात्पर्य.**—आधारभूत वस्तूंच्या सामर्थ्याशिवाय कोणताहि विषय प्रगट होऊं शकत नाहीं.

कामंक्रोधंतथालोभं स्वादुशृंगारकौतुके ॥
अतिनिद्रातिसेवाच विद्यार्थीह्यष्टवर्जयेत् ॥ २१५ ॥

**अर्थ.**—काम, क्रोध, लोभ, स्वादु ह्मणजे गोड, शृंगार, कौतुक ह्मणजे चमत्कार, निद्रा, सेवा या आठ विषयांचें अतिसेवन विद्यार्थ्यानें वर्ज करावें. **तात्पर्य.**—विद्यार्थ्यांनीं सुखकारक वस्तूंचें अतिसेवन करूं नये.

इक्षुदंडास्तिलाःशूद्राः कांताकांचनमेदिनी ॥
चंदनंदधितांबूलं मर्दनंगुणवर्धनम् ॥ २१६ ॥

**अर्थ.**—ऊंस, तीळ, शूद्र, स्त्री, सुवर्ण, पृथ्वी, चंदन, दहीं, आणि तांबूल यांचें जसजसें अधिकाधिक मर्दन करील, तसतसे त्यांचे गुण विशेष वाढतील. **तात्पर्य.**—स्वभावसिद्ध गुण मर्दनाशिवाय वृद्धिंगत होत नाहींत.

नराणांनापितोधूर्तः पक्षिणांचैववायसः ॥
चतुष्पदांशृगालस्तु स्त्रियांधूर्ताचमालिनी ॥ २१७ ॥

**अर्थ.**—नरामध्यें नापिक चतुर, पक्ष्यांमध्यें काक धूर्त, चतुष्पादामध्यें कोल्हा महा धूर्त, आणि स्त्रियांमध्यें माळिण धूर्त जाणावी. **तात्पर्य**—ज्यांचा सर्व ठिकाणीं प्रवेश असतो ते प्राणी महा धूर्त असतात.

संसारतापदग्धानां त्रयोविश्रांतिहेतवः ॥
अपत्यंचकलत्रंच सतांसंगतिरेवच ॥ २१८ ॥

**अर्थ.**—संसाराचे तापेंकरून दग्ध झालेल्या जनांस सुख होण्याविषयीं कारणें तीनच आहेत; एक सुंदर अपत्य, हास्यमुखी सुंदर स्त्री, आणि साधूंची संगति हीं तीन. यामध्यें सत्संगतीच श्रेष्ठ कांकीं, जिच्या

संगीकरून इहलोकीं सुखप्राप्त होऊन मुक्तिहि प्राप्त होते. **तात्पर्य.**—संसार तापामध्यें सत्संगति सारखी दुसरी विश्रांति नाहीं.

**गृहासक्तस्यनोविद्या नोदयामांसभोजिनः ॥**
**द्रव्यलुब्धस्यनोसत्यं स्त्रैणस्यनपवित्रता ॥ २१९ ॥**

**अर्थ.**—गृहाचेठायीं जो सक्त त्याला विद्या प्राप्त होत नाहीं; जो निरंतर मांसाहार करितो त्याला दया प्राप्त होत नाहीं; जो द्रव्यलोभी त्याला सत्य नाहीं, जो स्त्रैण ह्मणजे विषयी त्याला निर्मळपणा कधींच नाहीं. **तात्पर्य.**—विषयसक्तास पवित्र कर्मे घडत नाहींत.

**दुष्टभार्याशठंमित्रं भृत्यश्चोत्तरदायकः ॥**
**ससर्पेचगृहेवासो मृत्युरेवनसंशयः ॥ २२० ॥**

**अर्थ.**—ज्याची दुष्ट स्त्री आणि मित्र तेहि वंचक तसाच प्रत्युत्तर देणारा चाकर व सर्पयुक्त गृहीं वास ह्या गोष्टी मृत्यु समानच आहेत यांत संशय नाहीं. **तात्पर्य.**—घरांत दुष्टांचा वास मृत्युदायक होय.

**वाणीरसवतीयस्य भार्यापुत्रवतीसती ॥**
**लक्ष्मीर्दानवतीयस्य सफलंतस्यजीवितं ॥ २२१ ॥**

**अर्थ.**—ज्याची वाणी रसयुक्त असून भार्या साध्वी असून पुत्रवती असेल, व ज्याची संपत्ती दानाविषयीं योजलेली असते त्या मानवाचें जीवित सफल जाणावें. **तात्पर्य.**—उत्तम स्थिति आयुष्यास सफल करणारी होय.

**रिक्तपाणिर्नपश्येत राजानंदेवतांगुरुं ॥**
**दैवज्ञंभेषजंमित्रं फलेनफलमादिशेत् ॥ २२२ ॥**

**अर्थ.**—कांहीं भेट नेल्यावांचून रिकाम्या हातीं राजा, देव, गुरु, ज्योतिषी, वैद्य, मित्र, यांचें दर्शन घेऊं नये; आपल्या शक्तिप्रमाणें फलादिक जें अनुकूल असेल तें पुढें ठेवून काय बोलणें तें बोलावें. **तात्पर्य.**—कांहीं अर्पिल्याशिवाय भेट सफळ होत नाहीं.

**जामातोकृष्णसर्पस्य पावकोदुर्जनस्तथा ॥**
**उपकारोनजानाति पंचमोभगिनीसुता ॥ २२३ ॥**

**अर्थ.**—जावई, काळासर्प, अग्नि, दुर्जन, आणि भाचा हे पांच उपकार जाणत नाहींत. **तात्पर्य.**—अतृप्त असणारे परोपकार जाणत नाहींत.

परोपकरणंयेषां जागर्तिहृदयेसताम् ॥
नश्यंतिविपदस्तेषां संपदःस्युःपदेपदे ॥ २२४ ॥

अर्थ.—ज्या साधूंच्या हृदयांत निरंतर परोपकार जागतो ह्मणजे जे साधू सदैव परोपकार करितात त्यांच्या सकळ विपत्ति नाश पावतात; आणि जिकडेस जातील तिकडे त्यांस संपत्तिच प्राप्त होतात. तात्पर्य.—परोपकार फलद्रुप होतो.

नात्यर्थमर्थार्थितया लुब्धमुद्वेजयेज्जनं ॥
अब्धिर्दत्वाऽश्वरत्नस्त्री र्मथ्यमानोऽसृजद्विषं ॥२२५॥

अर्थ.—लोभी जनास याचकपणानें अति त्रास देऊं नये. कारण समुद्रानें अश्व, रत्न, व रंभादि देवस्त्रिया इतक्या वस्तु दिल्या असून त्याचें मंथन चालविलें असतां त्यांपासून विष निघालें. तात्पर्य.—दात्यास याचकानें अत्यंत त्रास दिल्यास त्याचा परिणाम वाईट होतो.

वीणेवश्रोत्रहीनस्य लोलाक्षीवविचक्षुषः ॥
व्यसोःकुसुममालेव विद्यास्तब्धस्यनिष्फला ॥२२६॥

अर्थ.—कर्णहीनास जसा विणा नाद निष्फळ, मृगनयना स्त्री जशी अंधापुढें व्यर्थ, पुष्पमाला जशी गतप्राण देहास व्यर्थ तशी नम्रतारहित पुरुषास विद्या निष्फळ आहे. तात्पर्य.—नम्रता ही विद्वानांचें भूषण होय.

समानेशोभतेप्रीती राज्ञिसेवाचशोभते ॥
वाणिज्यंव्यवहारेषु स्त्रीदिव्याशोभतेगृहे ॥ २२७ ॥

अर्थ.—आपल्या सारख्यावर प्रीति केली असतां ती शोभते, राजाचे ठायीं सेवा शोभते, व्यवहारामध्यें वाणीज्य शोभतें, सुंदर स्त्री गृहाचे ठायीं शोभते. तात्पर्य.—जेथील शोभा तेथेंच शोभते.

सेतुंगत्वासमुद्रस्य गंगासागरसंगमं ॥
ब्रह्महत्याविमुच्येत मित्रद्रोहीनमुच्यते ॥ २२८ ॥

अर्थ.—गंगेचा समुद्राशीं जेथें संगम झाला त्याठिकाणीं अथवा सेतुबंध रामेश्वरीं गेलें असतां ब्रह्महत्येचा दोष जातो; परंतु मित्रद्रोह पापापासून कोठेंच मुक्त होत नाहीं. तात्पर्य.—ब्रह्महत्येपेक्षांहि मित्रद्रोहाचें पातक अधिक जाणावें.

मित्रद्रोहीकृतघ्नश्च तथाविश्वासघातकः ॥
त्रयस्तेनरकंयांति यावच्चंद्रदिवाकरौ ॥ २२९ ॥

**अर्थ.**—मित्राचा घात करणारा, उपकार न जाणणारा, विश्वास देऊन घात करणारा हे तिघे जोंपर्यंत सूर्य चंद्र आहेत तोंपर्यंत नरकीं राहतात. तात्पर्य.—महत्पाप अक्षयीं नरकवासास कारण होय.

सिद्धांतःसर्वशास्त्राणां मथंनकलुषंपरम् ॥
विश्वासघातात्पुण्यंच नपरोपकृतेःपरं ॥ २३० ॥

**अर्थ.**—सर्व शास्त्रांचा सिद्धांत असा आहे कीं, विश्वास घातापरतें दुसरें घोर पातक नाहीं; आणि परोपकाराहून दुसरें मोठें पुण्य नाहीं. तात्पर्य.—विश्वासघातासारखें पाप आणि परोपकारासारखें पुण्य दुसरें कांहीं नाहीं.

वेधाद्वेधाभ्रमंचक्रे कांतासुकनकेषुच ॥
तासुतेष्वप्यनासक्तः साक्षाद्भर्गोनराकृतिः ॥ २३१ ॥

**अर्थ.**—ब्रह्मदेवानें मोह करणारे पदार्थ दोन उत्पन्न केले आहेत. एक स्त्री आणि दुसरें धन यांस पाहून जो मनुष्य भुलत नाहीं तो केवळ महादेव जाणावा. तात्पर्य.—स्त्री व धन यांस मोहित न होणारा ईश्वररूपच जाणावा.

वरंपर्वतदुर्गेषु भ्रांतंवनचरैःसह ॥
नमूर्खजनसंपर्कः सुरेंद्रभुवनेष्वपि ॥ २३२ ॥

**अर्थ.**—पर्वताच्या अवघड ठिकाणीं वनचराबरोबर संचार करणें हें बरें, परंतु मूर्ख जनाशीं संबंध इंद्र भुवनींहि नसावा. तात्पर्य.—मूर्खाचा सहवास अति दुःखदायक होय.

इंद्रवज्रा. ( चरणांतीं थांबावें. )

कार्येषुमंत्रीवचनेषुदासी ॥
भोज्येषुमाताशयनेषुरंभा ॥
धर्मानुकूलाक्षमयाधरित्री ॥
भार्याचषाड्गुण्यवतीहदुर्लभा ॥ २३३ ॥

**अर्थ.**—कामा काजामध्यें मंत्र्याप्रमाणें सल्ला देणारी, आज्ञा पाळण्याविषयीं दासीसारखी, भोजनादिकांचेठायीं मातेप्रमाणें, शयन प्रसंगीं रंभेसा-

रखी, धर्माविषयीं अनुकूळ, व पृथ्वीसारखी क्षमाशील, अशा षड्गुणांनीं युक्त स्त्री मिळणें परम दुर्लभ होय. तात्पर्य.—उत्तम स्वभावाच्या स्त्रिया सर्व ठिकाणीं नसतात.

त्यजंतिमित्राणिधनैर्विहीनं ॥
पुत्राश्चदाराश्चसुहृज्जनाश्च ॥
तमर्थवंतंपुनराश्रयंति ॥
ह्यर्थोहिलोकेपुरुषस्यबंधुः ॥ २३४ ॥

**अर्थ.**—मित्र, पुत्र, स्त्रिया, व संबंधी जन हे धनविरहित पुरुषाचा त्याग करितात, आणि तोच पुरुष द्रव्यवान झाला असतां ते मित्रादिक पुनः त्याचा आश्रय करितात यावरून लोकांत धनच पुरुषास बंधुरूप आहे असें सिद्ध होतें. तात्पर्य.—निर्धन पुरुषाचा सर्व त्याग करितात.

यःसुंदरस्तद्वनिताकुरूपा ॥
यासुंदरीसापतिरूपहीना ॥
यत्रोभयंतत्रदरिद्रताच ॥
विधेर्विचित्राणिविचेष्टितानि ॥ २३५ ॥

**अर्थ.**—जो रूपानें सुंदर असतो त्याची स्त्री कुरूप असून जी रूपानें सुंदरी असते तिचा पति रूपहीन असतो आणि जेथें स्त्री पुरुष उभयतां रूपसंपन्न असतात तेथें दारिद्य असतें. तस्मात् दैवाचीं चरित्रें विचित्र आहेत. तात्पर्य.—प्रत्येक ठिकाणीं कांहीं तरी न्यूनाधिकपणा असतो.

कल्पद्रुमःकल्पितमेवसूते ॥
साकामधुक्कामितमेवदोग्धि ॥
चिंतामणिश्चिंतितमेवदत्ते ॥
सतांहिसंगःसकलंप्रसूते ॥ २३६ ॥

**अर्थ.**—कल्पवृक्ष, कल्पित वस्तुच देतो, काम धेनु इच्छित पदार्थच देते, चिंतामणि चिंतित मनोरथच पूर्ण करितो, आणि साधूंचा समागम तर सर्व प्रसवतो. तात्पर्य.—साधूंची संगति कल्याणदायक होय.

स्त्रियोहिमूलंनिधनस्यपुंसः ॥
स्त्रियोहिमूलं व्यसनस्यपुंसः ॥

स्त्रियोहिमूलंनरकस्यपुंसः ॥
स्त्रियोहिमूलंकलहस्यपुंसः ॥ २३७ ॥

**अर्थ.**—स्त्रिया पुरुषास मरण, दुःख, नरक, व कलह यांच्या प्राप्तीला कारणभूत आहेत. **तात्पर्य.**—सर्व अनर्थांचें मूळ स्त्रिया होत.

उत्साहसंपन्नमदीर्घसूत्रं ॥
क्रियाविधिज्ञंव्यसनेष्वसक्तं ॥
शूरंकृतज्ञंदृढसौहृदंच ॥
लक्ष्मीःस्वयंयातिनिवासहेतोः ॥ २३८ ॥

**अर्थ.**—जो पुरुष सर्वदा उत्साह शक्तीनें संपन्न असून दीर्घ सूत्री कृतीच्या स्वभावानें युक्त नसेल आणि सर्व सत्कर्मांचा विधि जाणणारा, दुर्व्यसनाविषयीं अशक्त नसणारा, शूर, कोणीहि केलेले उपकार किंवा सेवा यांस जाणणारा, व सज्जनाशीं दृढ स्नेहानें वर्तणारा, अशा मानवाच्या सन्निध वास करण्याच्या हेतुनें लक्ष्मी स्वयमेव प्राप्त होते. **तात्पर्य.**—उत्तम गुण लक्ष्मीदायक होत.

सुखस्यदुःखस्यनकोपिदाता ॥
परोददातीतिकुबुद्धिरेषा ॥
अहंकरोमीतिवृथाभिमानः ॥
स्वकर्मसूत्रग्रथितोहिलोकः ॥ २३९ ॥

**अर्थ.**—आपल्यास सुख दुःख देणारा दुसरा कोणी नाहीं; दुसरा देतो असें ह्मणणें चुकीचें आहे, व मी करितों हा अभिमानहि व्यर्थ आहे. सर्व लोक आपल्या कर्मानें बांधले गेले आहेत. **तात्पर्य.**—सुख दुःख प्राप्ति आपल्या कर्मानुरूप होते.

स्वदेशजातस्यनरस्यनूनं ॥
गुणाधिकस्यापिभवेदवज्ञा ॥
निजांगनायद्यपिरूपराशि ॥
स्तथापिलोकःपरदाररक्तः ॥ २४० ॥

**अर्थ.**—स्वदेशामध्यें उत्पन्न झालेला पुरुष मोठा गुणवान् असला

तथापि तो अपमानास पात्र होतो. विवाहित स्त्री सौंदर्यानें जरी पुर्ण असली तथापि लोक परस्त्रीशीं लंपट होतात. तात्पर्य.—अत्यंत सहवासाच्या योगानें अनादर होतो.

दानेनपाणिर्नतुकंकणेन ॥
स्नानेनशुद्धिर्नतुचंदनेन ॥
मानेनतृप्तिर्नतुभोजनेन ॥
ज्ञानेनमुक्तिर्नतुमंडनेन ॥ २४१ ॥

**अर्थ.**—पुरुषास द्रव्य प्राप्त झालें असतां तो जर त्या द्रव्याचें दान हातानें करील तर त्याचा हात शोभा पावेल, जर कांकणें धारण केलीं तथापि त्यांनीं हात शोभणार नाहीं. देहास शुद्धि स्नानानेंच होय, स्नान न करितां जरी उत्तम चंदन धारण केलें तथापि त्यानें शुद्धि होत नाहीं. तशीच सन्मानानें जशी तृप्ति होते तशी तृप्ति भोजनानें श्रेष्ठ जनास होत नाहीं; आणि ज्ञानानें जशी मुक्ति प्राप्त होते, तशी मुंडनादि प्रायश्चित्तानें किंवा सन्यासानें होत नाहीं. तात्पर्य.—ज्ञात्यास मुंडनादि बाह्योपचार करणें नको.

येषांनविद्यानतपोनदानं ॥
नचापिशीलंनगुणोनधर्मः ॥
तेमर्त्यलोकेभुविभारभूता ॥
मनुष्यरुपेणमृगाश्चरंति ॥ २४२ ॥

**अर्थ.**—विद्या, तप, दान, उत्तम स्वभाव, गुण, आणि धर्म या सहांतून एकादि गुण ज्यास नाहीं ते नरलोकीं भुमीचेठायीं केवळ भाररूप मनुष्य देहानें मृगच फिरतात. तात्पर्य.—ज्याचे आंगीं सद्गुण नाहीं तो पशू जाणावा.

आहारनिद्राभयमैथुनानि ॥
समानिचैतानिनृणांपशूनाम् ॥
ज्ञानंनराणामधिकोविशेषो ॥
ज्ञानेनहीनाःपशुभिःसमानाः ॥ २४३ ॥

**अर्थ.**—आहार, निद्रा, भय, मैथुन हीं चार मनुष्यांस आणि पशूंस

सारखीच आहेत, मनुष्यास विषय भोगादिकांविषयीं ज्ञान आहे एवढें मात्र पशूंहून विशेष, ज्याला ज्ञान नाहीं ते पशूंसारखेच जाणावे. तात्पर्य.—ज्याला ज्ञान नाहीं तो पशू जाणावा.

कोलाहलेकाककुलस्यजाते ॥
विराजतेकोकिलकूजितंकिं ॥
परस्परंसंवदतांखलानां ॥
मौनंविधेयंसततंसुधीभिः ॥ २४४ ॥

**अर्थ.**—काक समुदायाचा कलकलाट चालत असतां कोकिलाच्या मधुर स्वराचा काय उपयोग होणार? मुर्ख लोकांच्या वादामध्यें पंडितांनीं मौन धरून बसणें हेंच त्यास भूषण होय. **तात्पर्य.**—शहाण्यानें मुर्खाच्या तोंडीं लागूं नये.

उपेंद्रवज्रा. ( चरणांतीं थांबावें. )

अनंतशास्त्रंबहुलाश्चविद्या ॥
अल्पश्चकालोबहुविघ्नताच ॥
यत्सारभूतंतदुपासनीयं ॥
हंसोयथाक्षीरमिवांबुमध्यात् ॥ २४५ ॥

**अर्थ.**—हे पुरुषा? तूं सकळ शास्त्राभ्यास करीन ह्मणशील तर शास्त्राचा अंत नाहीं, विद्याहि बहुत आहेत, आणि आयुष्याचा काळ थोडा त्यामध्यें विघ्नें बहुत आहेत, तस्मात् जें सार ह्मणजे विशेष हितकारक तेंच सेवावें यास दृष्टांत दुग्ध आणि उदक हीं एकत्र झालीं असतां हंस जसा उदकांतून भिन्न करून दुग्धच ग्रहण करितो. **तात्पर्य.**—ज्ञात्यानें सर्व अवलोकन करून सार असेल तेंच ग्रहण करावें.

वनेजनेशत्रुजलाग्निमध्ये ॥
महार्णवेपर्वतसंकटेवा ॥
सुप्तंप्रमत्तंविषमस्तिंवा ॥
रक्षंतिपुण्यानिपुराकृतानि ॥ २४६ ॥

**अर्थ.**—वनांत, रणांत, शत्रू, जल, अग्नि यांमध्यें आणि समुद्रांत,

तात्पर्य.—पुण्यमार्ग तारक आहे.

अहोनुकष्टःसततंप्रवासः ॥
ततोतिकष्टःपरगेहवासः ॥
कष्टाधिकानीचजनस्यसेवा ॥
ततोतिकष्टाधनहीनताच ॥ २४७ ॥

**अर्थ.**—सतत प्रवास करणें हें निश्चयें करून दुःखकारक असल्यामुळें खेदास्पद आहे आणि परगृहीं वास करणें हें प्रवासापेक्षां अधिक कष्टकारक आहे तशीच नीच सेवा अति दुःख कारक असून त्यापेक्षां निर्धनता अति कष्टदायक आहे. तात्पर्य.—सर्वांपेक्षां निर्धनत्व अति दुःख दायक होय.

क्षतेप्रहारानिपतंत्यभीक्ष्णं ॥
धनक्षयेदीप्यतिजाठराग्निः ॥
आपत्सुवैराणिसमुल्लसंति ॥
छिद्रेष्वनर्थाबहुलीभवंति ॥ २४८ ॥

**अर्थ.**—अंगास एकादें क्षत झालें असतां त्यावर वारंवार प्रहार होतात, आपणाजवळच्या धनाचा क्षय झाला असतां जठराग्नि अतिशयित प्रदिप्त होतो, आपणास आपत्ति प्राप्त झाल्या असतां त्या कालांत लोकांचीं वैरें उपस्थित होतात व कांहीं एकादी न्यूनता प्राप्त झाली असतां त्या संधींत बहुत अनर्थ प्राप्त होतात. तात्पर्य.—कांहीं कमीपणा झाला असतां त्या प्रसंगीं अनेक अनर्थ प्राप्त होतात.

मृगामृगैःसंगमनुव्रजंति ॥
गावश्चगोभिस्तुरगास्तुरंगैः ॥
मूर्खाश्चमूर्खैःसुधियःसुधीभिः ॥
समानशीलव्यसनेषुसख्यं ॥ २४९ ॥

**अर्थ.**—मृग मृगांशीं, गायी गायींशीं, घोडे घोड्यांशीं, मूर्ख मूर्खांशीं, आणि ज्ञाते ज्ञात्यांशीं सख्य ठेवितात. तस्मात् ज्याचा स्वभाव आणि

व्यवहार एक असतो त्याचें सख्य होतें. तात्पर्य.—स्वभाव आणि व्यवहार एक असल्यावांचून सख्य जमत नाहीं.

ननिर्मिताकेननदृष्टपूर्वा ॥
नश्रूयतेहेममयीकुरंगी ॥
तथापितृष्णारघुनंदनस्य ॥
विनाशकालेविपरीतबुद्धिः ॥ २५० ॥

**अर्थ.**—पूर्वी सुवर्णाची मृगी कोणीहि उत्पन्न केली नाहीं आणि कोणी अवलोकिलीहि नाहीं तशीच कोणी श्रवणहि केली नाहीं असें असतांहि रामचंद्रास त्या मृगीविषयीं इच्छा झाली. तस्मात् विनाशकाळीं बुद्धिमंतासहि विपरित बुद्धि होते. *तात्पर्य.*—विनाशकाळ आल्यावांचून विपरित बुद्धि होत नाहीं.

कुग्रामवासःकुलहीनसेवा ॥
कुभोजनंक्रोधमुखीचभार्या ॥
पुत्रश्चमूर्खोविधवाचकन्या ॥
विनाग्निनाषट्प्रदहंतिकायम् ॥ २५१ ॥

**अर्थ.**—कुग्रामीं रहाणें, कुलहीनाची सेवा, कदान्नभक्षण, सर्वकाळ क्रोध युक्त जिचें मुख अशी स्त्री, पुत्र मूर्ख आणि कन्या विधवा हीं सहा अग्निवांचून देहातें जाळितात. तात्पर्य.—दुःखदायक स्थिति मृतवत् जाणावी.

अर्थातुराणांनपितानबंधुः ॥
कामातुराणांनभयंनलज्जा ॥
क्षुधातुराणांनबलंनतेज ॥
चिंतातुराणांनसुखंननिद्रा ॥ २५२ ॥

**अर्थ.**—द्रव्याची इच्छा ज्यास फार आहे ते बाप आणि भाऊबंद यांची भीड राखित नाहींत; जे स्त्रीच्या व्यसनीं लागले त्यांस भय आणि लाज वाटत नाहीं; जे भुकेनें व्याकुल त्यांस तेज आणि बळ नसतें; ज्यास चिंता आहे त्यांस कोठेंहि सुख होत नाहीं आणि निद्रा येत नाहीं. तात्पर्य.—जो ज्या वस्तुविषयीं आतुर असतो त्याला ती वस्तु मिळाल्यावांचुन त्याचे मनाची स्थिरता होत नाहीं.

उपजाती. ( चरणांतीं थांबावे. )

भार्यावियोगःस्वजनापवादो ॥
ऋणस्यशेषंकृपणस्यसेवा ॥
दारिद्र्यकालेप्रियदर्शनंच ॥
विनाग्निनापंचदहंतिकायं ॥ २५३ ॥

**अर्थ.**—भार्येचा वियोग, आप्तजनांचा अपवाद, कर्जाचें शेष, कृपणाची सेवा, आणि विपत्ति कालामध्यें मित्राची भेट होणें, हीं ५ अग्नीवांचून शरीरास जाळणारीं होत. **तात्पर्य.**—दुःखकारक प्रसंग मृतवत् जाणावा.

यस्यास्तिवित्तंसनरःकुलीनः ॥
सपंडितःसश्रुतवान्गुणज्ञः ॥
सएववक्तासचदर्शनीयः ॥
सर्वेगुणाःकांचनमाश्रयंति ॥ २५४ ॥

**अर्थ.**—ज्या पाशीं द्रव्य आहे तोच नर कुलीन, तोच पंडित, तोच माहितगार, तोच गुणज्ञ, तोच वक्ता, आणि तोच भेट घेण्यास योग्य असा लोकांत होतो. तस्मात् समस्त गुण कांचनाचा आश्रय करितात. **तात्पर्य.**—धनवानास सर्व मान देतात.

सीदंतिसंतोविलसंत्यसंतः ॥
पुत्राम्रियंतेजनकश्चिरायुः ॥
परेषुमैत्रीस्वजनेषुवैरं ॥
पश्यंतुलोकाःकलिकौतुकानि ॥ २५५ ॥

**अर्थ.**—साधु दुःख पावतात, असत्पुरुष सुखांत असतात, पुत्र मृत्यु पावतात, पिता चिरायु असतो, परकीयांशीं मैत्री असते, व आप्तांशीं वैर असतें हीं कलियुगांतील आश्चर्यें लोक अवलोकन करोत. **तात्पर्य.**—कलियुगात सर्व विरुद्ध प्रकार चालला आहे.

स्वयंमहेशःश्वशुरोनगेशः ॥
सखाधनेशस्तनयोगणेशः ॥
तथापिभिक्षाटनमेवशंभो ॥
र्बलीयसीकेवलमीश्वरेच्छा ॥ २५६ ॥

**अर्थ.**—स्वतः महान् ईश्वर, सासरा हिमालय, मित्र कुबेर, पुत्र गणपती, असें असूनहि शंभूला भिक्षाटनच प्राप्त झालें आहे. तस्मात् केवल ईश्वरेच्छाच अति बलिष्ट हें सत्य आहे. *तात्पर्य.*—ईश्वरेच्छेपुढें कोणाचेंच कांहीं चालत नाहीं.

**अत्यंतकोपः परुषाच वाणी ॥**
**दरिद्रताचस्वजनेषुवेरम् ॥**
**नीचप्रसंगःकुलहीनसेवा ॥**
**चिन्हानिदेहेनरकास्थितानां ॥ २५७ ॥**

**अर्थ.**—फार क्रोध, कठोर भाषण, दरिद्रपणा, आप्त जनांशीं वैर, निचाशीं प्रसंग, आणि कुलहीन सेवा, हीं सहा नरकाचीं चिन्हें ज्यांचे हृदयीं निरंतर वास करितात, ते नरकांतच आहेत असें समजावें. **तात्पर्य.**—नीच चिन्हें अति दुःखदायक होत.

**पाणौगृहीतापिपुरस्कृतापि ॥**
**स्नेहेननित्यपरिवर्धितापि ॥**
**परोपकारायभवत्यवश्यं ॥**
**वृद्धस्यभार्याकरदीपिकेव ॥ २५८ ॥**

**अर्थ.**—आपली स्त्री हातीं धरून सर्व गृह कृत्यांत प्रमुख केली असून प्रीतीनें निरंतर वाढविली अशी वृद्ध पुरुषाची स्त्री नियमेंकरून परोपकारार्थ होते यांस दृष्टांत—हातांत मशाल धरणारास स्वतः दिसत नसून इतरांस मात्र तिचा प्रकाश उपयोगीं पडतो. **तात्पर्य.**—वृद्धास तरुण स्त्रीपासून कांहीं उपयोग होत नाहीं.

रथोद्धता (चरणांतीं यांबांहें)

**तावदेवविदुषांविवेकिनी ॥**
**बुद्धिरस्तिभवबंधछेदिनी ॥**
**यावदिंदुवदनानकामिनी ॥**
**वीक्षितारहसिहंसगामिनी ॥ २५९ ॥**

**अर्थ.**—हंसगामिनी अशी जी चंद्रवदना स्त्री तिची जोंपर्यंत एकांताचे

ठायीं गांठ पडली नाहीं तोंपर्यंतच ज्ञाते पुरुषांच्या बुद्धीला विवेक असतो वरील प्रसंग प्राप्त झाला असतां विवेक करणारा पुरुष फार विरळा. याकरितांच परमार्थी जनाला प्रमदा दर्शनाहि वर्ज्य सांगितलें आहे. **तात्पर्य.**—एकांतीं सुंदर स्त्रीचें दर्शन झालें असतां कसाहि विवेकी पुरुष असला तरी त्याचें मन चंचल झाल्यावांचून राहणार नाहीं.

**पूर्वजन्मजनितंपुराविदः ॥**
**कर्मदैवमितिसंप्रचक्षते ॥**
**उद्यमेनतदुपार्जितंचिरा ॥**
**दैवमुद्यमवशंनतत्कथं ॥ २६० ॥**

**अर्थ.**—पूर्व जन्मांत केलेल्या कर्मास दैव असें पुरातन ज्ञाते ह्मणतात यावरून दैव पूर्वी चिरकाल उद्योगानेंच संपादन केलेलें आहे यास्तव तें तरी उद्योगाधीन नाहीं हें कसें घडेल ? **तात्पर्य.**—दैव हें उद्योगाधीन आहे.

**वंशस्थ** (चरणांतीं थांबावें.)

**हितैषिणःसंतिनतेमनीषिणः ॥**
**मनीषिणःसंतिनतेहितैषिणः ॥**
**हितश्चविद्वांश्चसुदुर्लभोजनो ॥**
**यथौषधंस्वादुचरोगहारि ॥ २६१ ॥**

**अर्थ.**—हितकर्ते असतात ते प्रीतिपात्र नसतात, व जे प्रीतिपात्र असतात ते हितकर्ते नसतात. हितकर्ते असून विद्वान् असे लोक मधुर असून रोग हरण करणाऱ्या औषधाप्रमाणें दुर्लभ होत. **तात्पर्य.**—हित करून प्रीतिपात्र असणारा मनुष्य दुर्लभ होय.

**असत्यमप्रत्ययमूलकारणं ॥**
**कुवासनासद्मसमृद्धिवारणं ॥**
**विपन्निदानंपरवंचनोर्जितं ॥**
**कृतापराधंकृतिभिर्विवर्जितं ॥ २६२ ॥**

**अर्थ.**—असत्य अविश्वासाचें मूल कारण असून कुत्सित वासनांचें केवल घरच आहे आणि तें संपत्तीचें नाशक, विपत्तीचें आदिकरण, दुसऱ्याच्या वंचनेविषयीं बलवत्तर व बहुत अपराध घडविणारें असें असत्य

भाषण अनेक दोषयुक्त असल्यामुळें तें सज्जनांनीं वर्ज केलें आहे. तात्पर्य.—असत्य भाषण नाशास कारण होय.

वसंततिलका. ( चरणांतीं थांबावें. )

कांताकटाक्षविशिखानदहंतियस्य ॥
चित्तंननिर्दहतिकोपकृशानुतापः ॥
कर्षंतिभूरिविषयाश्चनलोभपाशै ॥
र्लोकत्रयंजयतिकृत्स्नमिदंसधीरः ॥ २६३ ॥

**अर्थ.**—स्त्रीचे कटाक्षबाण ज्याच्या चित्ताचा भेद करीत नाहींत, व कोपरूपी अग्नि ज्याचें चित्त जाळीत नाहीं, आणि महान विषय लोभ पाशांनीं ज्याचें चित्त आकर्षण होत नाहीं असा जो धीर तो सकळ त्रैलोक्य जिंकितो. तात्पर्य.—धैर्यवान हा अजिंक्य होय.

छिन्नोपिचंदनतरुर्नजहातिगंधं ॥
वृद्धोपिवारणपतिर्नजहातिलीलां ॥
यंत्रार्पितोमधुरतांनजहातिइक्षुः ॥
क्षीणोपिनत्यजतिशीलगुणान्कुलीनः ॥ २६४ ॥

**अर्थ.**—चंदनाचा वृक्ष छेदिला असतांहि सुगंधातें त्यागीत नाहीं; तसाच गजपति वृद्ध झाला असतांहि कधींच लीलेतें टाकीत नाहीं, आणि उंस यंत्रांत घालून पिळिला असतांहि मधुरपणातें कदापि सोडित नाहीं; तसा जो कुलीन तो द्रव्यादिकानें क्षीण झाला तरी कधींहि आपल्या उत्तम स्वभावातें आणि श्रेष्ठ गुणातें टाकीत नाहीं. तात्पर्य.—कुलीन हे संकट काळींहि आपला गुण सोडीत नाहींत.

आरभ्यतेनखलुविघ्नभयेननीचैः ॥
प्रारभ्यविघ्नविहताविरमंतिमध्याः ॥
विघ्नैःपुनःपुनरपिप्रतिहन्यमानाः ॥
प्रारभ्यउत्तमजनानपरित्यजंति ॥ २६५ ॥

**अर्थ.**—नीच पुरुष विघ्नाच्या भयास्तव एकाद्या उद्योगास आरंभ करीत नाहींत्, आणि मध्यम पुरुष आरंभ करून विघ्नामुळें टाकितात,

परंतु जे उत्तम आहेत ते जरी वारंवार विघ्नें आलीं तरी आरंभून टाकीत नाहींत. तात्पर्य.—उत्तम पुरुष हातीं धरिलेलें कार्य शेवटास नेतात.

वैद्यावदंतिकफपित्तमरुद्विकारान् ॥
ज्योतिर्विदोग्रहगतिपरिवर्तयंति ॥
भूताभिषंगइतिभूतविदोवदंति ॥
प्राचीनकर्मबलवन्मुनयोवदंति ॥ २६६ ॥

**अर्थ.**—वैद्याकडे गेलें असतां ते कफ पित्तादिक विकार सांगतात, ज्योतिष्याकडे गेलें ह्मणजे ते ग्रह पीडादिक वर्तवितात, भुत वैद्याकडे गेलें असतां ते भुताची बाधा सांगतात, आणि वेदांति आहेत ते तर पूर्व कर्मास बलवत्तर ह्मणतात. तात्पर्य.—मर्म जाणून खरें सांगणारा क्वचित्. ज्याचा जो विषय असतो तोच तो प्रतिपादन करितो.

दातानदापयतिदापयितानदत्ते ॥
योदानदापनपरोमधुरंनवक्ति ॥
दानंचदापनमथप्रियभाषणंच ॥
त्रीण्यप्यमूनिखलुसत्पुरुषेवसंति ॥ २६७ ॥

**अर्थ.**—जो दाता असतो तो इतरांकडून याचकास देववीत नाहीं, आणि जो अन्याकडून देववितो तो स्वतः दान करीत नाहीं; तसाच जो स्वतःदान करीत असून दुसऱ्याकडूनहि देववितो तो मधुर भाषण करीत नाहीं. तर दान करणें, इतरांकडून देवविणें, व प्रीय भाषण करणें हे तिन्ही गुण सत्पुरुषाच्या आंगीं निश्चयें करून वास करितात. **तात्पर्य.**—सर्व गुण संपन्न दाता असा विरळा.

मालिनी (आठ आणि सात अक्षरांवर थांबावें.)

उदयतियदिभानुः पश्चिमेदिग्विभागे ॥
प्रचलतियदिमेरुः शीततांयातिवन्हिः ॥
विकसतियदिपद्मं पर्वताग्रेशिलायां ॥
नभवतिविपरीतं भाषितंसज्जनानां ॥ २६८ ॥

**अर्थ.**—सुर्य जरी पश्चिम दिशेच्या भागांत उदय पावला, मेरु जरी

चलन पावेलौ, आग्न जरी शीतल होईल, पर्वत जरी ... शिळेवर प्रफुल्लित होईल, तरी सज्जनाचें भाषण विपरीत होत नाहीं. तात्पर्य.—सज्जनाचें भाषण अन्यथा होत नाहीं.

गुणवदगुणवद्वा कुर्वताकार्यमादौ ॥
परिणतिरवधार्या यत्नतःपंडितेन ॥
अतिरभसकृतानां कर्मणामाविपत्ते ॥
र्भवतिहृदयदाही शल्यतुल्योविपाकः ॥ २६९ ॥

**अर्थ.**—चांगलें अथवा वाईट कांहीं एक कर्म करावयास जो अनुसरेल त्या पंडितानें आधीं त्या कर्माचा परिणाम यत्नानें पहावा कारण कीं, फार त्वरेनें केलेले कर्मांत विपरीतपणा होऊन त्याकर्माचा परिपाक ह्मणजे फळ, मरणपर्यंत हृदयाला जाळणाऱ्या शल्याप्रमाणें ह्मणजे बाणाच्या अग्राप्रमाणें होतें. **तात्पर्य.**—कोणत्याहि कर्माचा आदि पश्चात विचार केल्यावांचून तें करूं नये.

**शिखरिणी** ( सहा आणि अकरा अक्षरांवर थांबावें. )

प्रदानंप्रच्छन्नं गृहमुपगतसंभ्रमविधिः ॥
प्रियंकृत्वामौनं सदसिकथनंचाप्युपकृतेः ॥
अनुत्सेकोलक्ष्म्या मलघुभवसाराःपरकथाः ॥
सतांकेनोद्दिष्टं विषममसिधाराव्रतमिदं ॥ २७० ॥

**अर्थ.**—बोभाट न करितां दान, कोणी घरीं आला असतां आदर सत्कार, दुसऱ्याचें बरें करून बडबड न करणें, उपकार केला असेल तो चौघांत बोलून न दाखविणें, लक्ष्मीचा उन्माद न करणें, इहलोकीं चांगल्या आणि परमार्थीक दुसऱ्याच्या गोष्टी बोलणें हें परम कठीण, तरवारीच्या धारेप्रमाणें व्रत सज्जनास कोणी उपदेशिलें असेल तें असो तरहें तीव्र व्रत त्यांस कोणीं उपदेशिलें नाहीं हा त्यांचा स्वभाव सिद्धच गुण आहे. **तात्पर्य.**—चांगुलपणा हा स्वभाव सिद्ध आहे शिकविल्यानें येत नाहीं.

नदेवेदेवत्वं कपटपटवस्तापसजना ॥
जनोमिथ्यावादी विरलतनुवृष्टिर्जलधरः ॥

प्रसंगोनीचाना मवनिपतयोदुष्टमनसो ॥
जनाभ्रष्टानष्टा अहहकलिकालःप्रभवति ॥ २७१ ॥

**अर्थ.**— देवांत देवत्व नाहीं; तपस्वी जन कपटाविषयीं कुशल, लोक असत्य भाषण करणारे मेघ क्वचित् व तीहि अल्पच वृष्टि करणारे, नीचांशीं प्रसंग, राजे दुष्ट मनाचे या प्रकारें लोक सन्मार्गापासून भ्रष्ट असल्यामुळें नीचत्व पावले असा कलि काल अद्भुत उत्कर्षानें वर्तत आहे. तात्पर्य.—सर्वत्र भ्रष्टाकार होणें हा कलियुगाचाच प्रादुर्भाव होय.

कलियुगाचे स्वरूप.

पदन्यासोगेहाद्बहिरहिफणारोपणसमो ॥
निजावासादन्य द्भवनमपरद्वीपतुलितं ॥
वचोलोकालभ्यं कृपणधनतुल्यंमृगदृशः ॥
पुमानन्यःकांता द्वियुरिवचतुर्थीसमुदितः ॥ २७२ ॥

**अर्थ.**—आपल्या गृहद्वाराच्या बाह्य प्रदेशीं पाय ठेवणें जिला सर्पाच्या फणेवर ठेवल्यासारखें वाटत असून स्वगृहांतून अन्यगृहीं जाणें जिला द्वीपांतरीं जाण्या समान भासतें तसेंच ज्या मृगनयनेचें भाषण कृपणाच्या धनासारखें लोकांस सर्वदां दुर्लभ असतें, त्याचप्रमाणें जिला स्वभर्याहून अन्य पुरुष गणेश चतुर्थीला उदयास आलेल्या चंद्रासमान अदर्शनीय असतो ती स्त्री पतिव्रता जाणावी. तात्पर्य.—पातिव्रत्य बाळगण्यास स्त्रियांच्या मनाचीच दृढता होय.

पृथ्वीछंद ( आठ आणि नऊ अक्षरांवर थांबावें. )

अनंकुरितकूर्चकः सतुसितोपलाढ्यंपयः ॥
सएवधृतकूर्चकः सलवणांबुतक्रोपमः ॥
सएवसितकूर्चकः क्वथितगुग्गुलाद्वेगकृत् ॥
भवतिहरिणीदृशां प्रियतमप्रभावास्त्रयः ॥२७३ ॥

**अर्थ.**—मृगनयना स्त्रियांस स्वकीय अतिप्रिय पुरुषाविषयीं तीन प्रकारचे भाव होतात ते असे कीं, ज्यास मुखावर मिशा वगैरे केश उत्पन्न झाले नाहींत तो तर त्यांस खडीसाखरयुक्त आटींव दुधासारखा सुखावह होतो, आणि तोच मुखावर केश आले असतां लवण व उदक यांणी मिश्रित झालेल्या तक्रासमान त्या स्त्रियास वाटतो, व तोच मुखावर शुभ्र

केशांनीयुक्त झाला असतां गुग्गुळाच्या काड्यासारखा स्त्रियांच्या मनास त्रासकारक होतो. तात्पर्य.—जसजसें पुरुषाचें वय अधिक होत जातें तसतशी स्त्रिची प्रीति कमी होत जाते.

मंदाक्रांता (चार, सहा, सात अक्षरांवर थांबावें.)

सर्वस्यद्वे सुमतिकुमती संपदापत्तिहेतू ॥
एकोगोत्रे प्रभवतिपुमान् यःकुटुंबंबिभर्ति ॥
वृद्धोयूना सहपरिचयात् त्यज्यतेकामिनीभिः ॥
स्त्रीपुंवच्च प्रभवतियदा तद्धिगेहंविनष्टं ॥ २७४ ॥

अर्थ.—सर्वांस दोन प्रकारच्या बुद्धि होतात त्या अशा कीं, एक सुबुद्धि, व दुसरी कुबुद्धि; त्यांतील सुबुद्धि संपत्ति प्राप्तीला कारण असून कुबुद्धि विपत्तीला कारण होते; तसाच कुटुंब पोषण करण्याविषयी समर्थ असा जो पुरुष तो वंशांत् एकच असतो, आणि विषयासक्त स्त्रियांचा तरुण पुरुषांशीं परिचय झाला असतां त्या वृद्ध पुरुषाचा त्याग करितात, व ज्या गृहांत स्त्री पुरुषासारखी सर्व कार्यांत प्रबल ज्या कालीं होते त्याच कालीं तें गृह विनाशोन्मुख झालें असें समजावें. तात्पर्य.—ज्या गृहांत पुरुष असून स्त्रीचें प्राबल्य असतें त्या गृहास लघुत्व येतें.

मौनान्मूकः प्रवचनपटु र्वाचकोजल्पकोवा ॥
धृष्टःपार्श्वे प्रभवतितदा दूरतश्चाप्रगल्भः ॥
क्षांत्याभीरु र्यदिनसहते प्रायशोनाभिजातः ॥
सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः ॥ २७५ ॥

अर्थ.—उगीच राहिलें तर मुखदुर्बळ ह्मणतात, बोलका असला तर वाचाल अथवा बडबड्या ह्मणतात, जर जवळ आला तर धट्ट ह्मणतात, दुर राहिला तर अप्रौढ, सोसून घेऊं लागला तर भित्रा, बरें, जर सोसून घेत नाहीं तर चिरडखोर अथवा मूर्ख ह्मणतात. तस्मात् चाकरीचें नातें फार अवघड. योग्यासहि यथास्थितपणीं चालविण्यास कठीण आहे. तात्पर्य.—चाकरी करून शेवटपर्यंत यश मिळविणें फार दुर्घट आहे.

विद्यानामनरस्यरूपमधिकं प्रच्छन्नगुप्तंधनं ॥
विद्याभोगकरीयशःसुखकरी विद्यागुरूणांगुरुः ॥
विद्याबंधुजनेविदेशगमने विद्यापरादेवता ॥
विद्याराजसुपुजितानतुधनं विद्याविहीनःपशुः ॥२७६ ॥

**अर्थ.**—विद्या हेंच पुरुषाचें उत्तम रूप प्रसिद्ध असून आच्छादन केलेलें अंतर्धन आहे आणि विद्या, भोग, यश, व सुख हीं देणारी असून तीच सकळ श्रेष्ठ वस्तूंत श्रेष्ठ आहे. तसेंच बंधु जनांत व परदेशांत गमन केलें असतां तेथेंहि विद्याच रक्षक असल्यानें विद्याच सर्वांची परम देवता असून तिची उत्तम रीतीनें पूजा राजा जशी करितो तशी धनाची करीत नाहीं. तस्मात् विद्याहीन जो पुरुष असेल तो पशु जाणावा. तात्पर्य.—विद्या हें नराचें भूषण होय.

यद्धात्रानिजभालपट्टलिखितंस्तोकंमहद्वाधनं ॥
तत्प्राप्नोतिमरुस्थलेऽपिनितरांमेरौततोनाधिकं ॥
तद्धीरोभवचित्तवत्सकृपणांवृत्तिंवृथामाकृथाः ॥
कूपेपश्यपयोनिधावपिघटोगृण्हातितुल्यंजलं ॥ २७७ ॥

**अर्थ.**—ब्रह्मदेवानें जें आपल्या कपाळरूप पट्टावर लिहिलेलें अल्प किंवा महत् असें धन असेल तें मार्वाड देशांतहि निश्चयें करून प्राप्त होतें आणि मेरूवर गेलें तरी त्यापेक्षां अधिक मिळत नाहीं. यास्तव हे वत्सा चित्ता, तूं धैर्य धारणकर, व ही दीन वृत्ति व्यर्थ करूं नको. कारण पहा कीं, घट, कूप, व समुद्र या दोन्ही स्थलांत आपल्या अवकाशानुरूप सारखेंच उदक ग्रहण करतो. तात्पर्य.—जें मिळणें आहे तें हरप्रकारानें मिळतें.

आदौरूपविनाशिनीकृशकरीकामस्यविध्वंसिनी ॥
ज्ञानेमांद्यकरीतपःक्षयकरीधर्मस्यनिर्मूलिनी ॥
पुत्रभ्रातृकलत्रभेदनकरीलज्जाकुलछेदिनी ॥
सामांपीडयतिसर्वदुःखजननीप्राणापहारीक्षुधा ॥२७८॥

**अर्थ.**—कोणी एक पुरुष क्षुधेनें पीडित होत्साता ह्मणतो, प्रथमतः

रूपाचा नाश करणारी, शरीरास कृशता आणणारी, कामसुखाचा विध्वंस करणारी, ज्ञानमार्ग बंद करणारी, तपाचा क्षय करणारी, धर्माचा उच्छेद करणारी, आप्त पत्नी इत्यादिकांविषयीं विरोध उत्पन्न करणारी, लज्जेचा समूळ नाश करणारी, सर्व दुःखांची जननी अशी जी प्राणघातक क्षुधा ती प्रस्तुत मला पीडा करीत आहे. **तात्पर्य.**—पोटाची आग फार कठीण आहे.

**जाड्यंह्रीमतिगण्यतेव्रतरुचौदंभःशुचौकैतवं ॥**
**शूरेनिर्घृणतामुनौविमतितादैन्यंप्रियालापिनी ॥**
**तेजस्विन्यवलिप्ततामुखरतावक्तर्यशक्तिस्थिरे ॥**
**तत्कोनामगुणोभवेत्सुगुणिनांयोदुर्जनैर्नांकितः ॥ २७९ ॥**

**अर्थ.**—दुर्जन जे आहेत ते मर्यादशीलांस मूर्ख ह्मणतात, व्रतस्थांस दांभिक, शुचिर्भूतांस ठक, शूरांस निर्दय, मन स्वाधीन ठेवून बडबड न करणारांस अप्रबुद्ध, मधुर भाषण बोलणाऱ्यांस दीन अथवा आर्जवी, तेजस्व्यांस गर्विष्ठ, वक्त्यांस वाचाल, आणि शांत, व स्थिर असतील त्यांस दुर्बळ ह्मणतात. तस्मात् गुणीजनांचा गूण दुर्जनांनीं निंदिला नाहीं असा कोणताहि नाहीं. **तात्पर्य.**—उत्तम गुणातें इच्छिणाऱ्या पुरुषानें दुर्जनाचा संग करूं नये.

**लोभश्चेदगुणेनकिंपिशुनतायद्यस्तिकिंपातकैः ॥**
**सत्यंचेत्तपसाचकिंशुचिमनोयद्यस्तितीर्थेनकिं ॥**
**सौजन्यंयदिकिंजनैःसुमहिमायद्यस्तिकिंमंडनैः ॥**
**सद्विद्यायदिकिंधनैरपयशोयद्यस्तिकिंमृत्युना ॥ २८० ॥**

**अर्थ.**—लोभ जर आहे तर दुसरा दुर्गुण कोणता पाहिजे? जर दुष्टपणा आहे तर त्याहून पातकें कोणतें, सत्य असतां त्याहून दुसरें तप कोणतें, मन जर शुद्ध आहे तर तीर्थ कशाला पाहिजे, सालसपणा आहे तर आप्तास काय तोटा, कीर्ति, लौकिक जर आहे तर दागिन्याची काय गरज, चांगली विद्या जर असेल तर धनास काय तोटा, आणि जर दुर्लौकिक व अपकीर्ति आहे तर मृत्यूंत काय फेर तर मृत्यु जवळच आहे. **तात्पर्य.**—

जसें आचरण तसें त्याचें फळ, फरक इतकाच कीं, वाईटाचें फळ तात्काळ येतें, आणि चांगल्याचें येण्यास उशीर लागतो.

वांछासज्जनसंगमेपरगुणेप्रीतिर्गुरौनम्रता ॥
विद्यायांव्यसनंस्वयोषितिरतिर्लोकापवादाद्भयं ॥
भक्तिःशूलिनिशक्तिरात्मदमनेसंसर्गमुक्तिःखले ॥
ष्वेतेयेषुवसंतिनिर्मलगुणास्तेभ्योनरेभ्योनमः ॥ २८१ ॥

**अर्थ.**—सज्जन संगमाविषयीं वांच्छा; परक्याच्या गुणावर प्रीति; आई, बाप, विद्वान, वडील, गुरु इत्यादिकांजवळ नम्रता; विद्याभ्यासाठायीं व्यसन; आपले स्त्रिचे ठिकाणीं रति, लोकापवादाचें भय, शंकराचें ठायीं भक्ति, इंद्रियाचे दमनाविषयीं शक्ति, आणि दुष्टांचे संसर्गापासून अलिप्तपण असे हे निर्मळ गुण ज्यांच्या ठायीं राहतात त्या नरांस नमस्कार असो. **तात्पर्य.**—उत्तम लक्षणांनीं युक्त पुरुष श्रेष्ठ जाणावा.

तृष्णांछिंधिभजक्षमांजहिमदंपापेरतिंमाकृथाः ॥
सत्यंब्रूह्यनुयाहिसाधुपदवींसेवस्वविद्वज्जनान् ॥
मान्यान्मानयविद्विषोप्यनुनयप्रच्छादयस्वान्गुणान् ॥
कीर्तिंपालयदुःखितेकुरुदयामेतत्सतांलक्षणम् ॥ २८२॥

**अर्थ.**—तृष्णा छेदून टाक, क्षमा धर, मद जिंक, पापावर रति धरूं नको, खरें बोल; थोराचे मार्गास लाग, विद्वानाची सेवा कर, मान्यास मान दे, शत्रूचे ठायींहि नम्रता धर, आपले गुणाचें आच्छादन कर, कीर्ति पाळ, आणि दुःखितावर दया कर, कां कीं, हीं साधूचीं लक्षणें आहेत ह्मणून. **तात्पर्य.**—उत्तम गुणांचा संग्रह केल्याशिवाय साधुत्व प्राप्त होत नाहीं.

कोलाभोगुणिसंगमःकिमसुखंप्राज्ञेतरैःसंगतिः ॥
काहानिःसमयेच्युतिर्निपुणताकाधर्मतत्वरतिः ॥
कःशूरोविजितेंद्रियःप्रियतमाकानुव्रताकिंधनं ॥
विद्याकिंसुखमप्रवासगमनंराज्यंकिमाज्ञाफलं ॥ २८३ ॥

**अर्थ.**—लाभ कोणता तर गुणि जनाची संगती, दुःख कोणतें तर

अज्ञ जनाचा समागम, हानि कोणती तर प्रसंगीं चुकणें, निपुणपणा कोणता तर स्वधर्म व तत्वज्ञान यांच्याठायीं रत असणें, शूर कोण तर इंद्रियें जिंकणारा, प्रियकर कोणती तर आपले वरच मन ठेवणारी, धन कोणतें तर विद्या, सुख कोणतें तर प्रवासास न जाणें; राज्य कोणतें तर आज्ञा चालविणें. तात्पर्य.—लाभादि सुख दुःख जें खरें आहे तें हेंच जाणावें.

तावत्सर्वगुणालयःपटुमतिःसाधुःसतांवल्लभः ॥
शूरःसच्चरितःकलंकरहितोमानीकृतज्ञःकविः ॥
दक्षोधर्मरतः सुशीलगुणवांस्तावत्प्रतिष्ठान्वितो ॥
यावन्निष्ठुरवज्रपातसदृशंदेहीतिनोभाषते ॥ २८४ ॥

अर्थ.—मनुष्य जोंपर्यंत कठोर वज्रपातासमान दे असें भाषण करीत नाहीं तोंपर्यंतच तो सर्व गुणांचा स्थान भूत असून उत्तम बुद्धिमान, साधु, साधूमध्यें प्रिय, शूर, सदाचार संपन्न, कलंक रहित, मानी, केलेलें कर्म जाणणारा, ज्ञानी, कार्याविषयीं दक्ष, धर्मतत्पर, सुशील, गुणवान् व सकल-प्रतिष्ठायुक्त असा असतो. तात्पर्य.—जोंपर्यंत मनुष्य कांहीं मागत नाहीं तोंपर्यंतच त्याच्या गुणांची शोभा असते.

निर्वीर्यापृथिवीनिरोषधिरसानीचामहत्वंगता ॥
भूपालानिजकर्मधर्मरहिताविप्राःकुमार्गेरताः ॥
भार्याभर्तृविरोधिनीपररतापुत्राःपितुर्द्वेषिणो ॥
हाकष्टंखलुवर्ततेकलियुगेधन्यानराःसज्जनाः ॥ २८५ ॥

अर्थ.—पृथ्वी वीर्यहीन; औषधी रस रहित; नीच महत्वास गेलेले; राजे स्वकर्म धर्मांनींरहित; ब्राह्मण कुमार्गाच्या ठायीं तत्पर; स्त्री या पतीशीं विरोध करणाऱ्या असून परपुरुषाशीं रत व पुत्र पित्याचा द्वेष करणारे असें कलि-युगांत निश्चयें करून खेदकारक दुःख आहे; तथापि त्यांत जे मानव सज्जन असतील ते धन्य जाणावे. तात्पर्य.—अशा या दुष्ट कलियुगांत जे नर धर्मानें वागतात ते धन्य होत.

क्रोशंतःशिशवःसवारिसदनंपंकावृतंचांगणं ॥
शय्यादंशवतीचरूक्षमशनंधूमेनपूर्णंगृहं ॥
भार्यानिष्ठुरभाषिणीप्रभुरपिक्रोधेनपूर्णःसदा ॥
स्नानंशीतलवारिणाहिसततंधिग्धिग्गृहस्थाश्रमम्॥२८६॥

**अर्थ.**—रोदन करणारीं मुलें, ओलीनें भरलेलें घर, आंगणांत चिखल, ढेकुणादिक दंश करणाऱ्या प्राण्यांनीं व्याप्त शय्या, रूक्ष भोजन, धुरानें पूर्ण घर, निष्ठुर भाषण करणारी स्त्री, यजमानहि सर्वदा क्रोधानें पूर्ण, निरंतर शीतोदकानें स्नान अशा गृहस्थाश्रमास सर्वथैव धिक्कार असो. **तात्पर्य.**—दुःखदायक गृहस्थाश्रमापेक्षां दिक्षा घेणें हें फार चांगलें.

सानंदंसदनंसुताश्चसुधियःकांतानदुर्भाषिणी ॥
सन्मित्रंसधनंस्वयोषितिरतिश्चाज्ञापराःसेवकाः ॥
आतिथ्यंशिवपूजनंप्रतिदिनंमिष्टान्नपानंगृहे ॥
साधोःसंगमुपासतेहिसततंधन्योगृहस्थाश्रमः ॥ २८७ ॥

**अर्थ.**—आनंदयुक्त घर, उत्तम बुद्धिमंत पुत्र, स्त्री दुर्भाषण न करणारी, धनसंपन्न उत्तम मित्र, स्वस्त्रीच्याच ठिकाणीं क्रीडा, आज्ञाधारक सेवक, प्रति दिवशीं शिवपूजन, अतिथि सन्मान पूर्वक, स्वगृहींच मिष्टान्न भक्षण व मिष्ट दुग्ध जलादि प्राशन, तसाच सतत साधुसंग सेवितात असे ज्या गृहीं घडेल तो गृहस्थाश्रम धन्य जाणावा. **तात्पर्य.**—ज्या घरीं सर्व अनुकूळ असून स्वधर्म घडतो तोच गृहस्थाश्रम उत्तम होय.

मानुष्यंवरवंशजन्मविभवोदीर्घायुरारोग्यता ॥
सन्मित्रंसुसुतःसतीप्रियतमाभक्तिश्चनारायणे ॥
विद्वत्वंसुजनत्वमिंद्रियजयःसत्पात्रदानेरति ॥
स्तेपुण्येनविनात्रयोदशगुणाःसंसारिणांदुर्लभा ॥२८८॥

**अर्थ.**—मनुष्यत्व, त्यांत श्रेष्ठ वंशांत जन्म, ऐश्वर्य, दीर्घायु, आरोग्यता, उत्तम मित्र, सुपुत्र, अति प्रिय असून पतिव्रता अशी स्त्री, नारायणाविषयीं भक्ति, विद्वत्ता, सुजनत्व, इंद्रियजय आणि सत्पात्रीं दान करण्या-

विषयीं प्रीति हे तेरा गुण संसारी जनांस पुण्यावांचून दुर्लभ आहेत. **तात्पर्य.**—उत्तम स्थितींत असणारा भाग्यवंत जाणावा.

गात्रंसंकुचितंगतिर्विगलिताभ्रष्टाचदंतावलि ॥
दृष्टिर्नश्यतिवर्धतेबधिरतावक्त्रंचलालायते ॥
वाक्यंनाद्रियतेचबांधवजनैर्भार्यानशुश्रूषते ॥
हाकष्टंपुरुषस्यजीर्णवयसःपुत्रोप्यमित्रायते ॥ २८९ ॥

**अर्थ.**—जरा प्राप्त झाली असतां अवयव संकुंचित होऊन गति विगलित होते, दंत पंक्ति पडते, अवलोकन शक्ति नाश पावते, बहिरेपणा वाढतो, मुख लाळेनें व्याप्त होतें, बांधव जन पूर्ववत वचनाचा आदर करीत नाहींत, भार्या सेवा करीत नाहीं, व पुत्राहि शत्रूसारखा वर्तूं लागतो तस्मात् जराग्रस्त वयाच्या पुरुषाचें दुःख परम खेदास्पद आहे. **तात्पर्य.**— वृद्धापकाळ हा अति दुःखदायक होय.

विश्वामित्रपराशरप्रभृतयोवातांबुपर्णाशना ॥
स्तेपिस्त्रीमुखपंकजंसुललितंदृष्ट्वैवमोहंगताः ॥
शाल्यन्नंसघृतंपयोदधियुतंभुंजंतियेमानवा ॥
स्तेषामिंद्रियनिग्रहोयदिभवेद्विंध्यस्तरेत्सागरे॥ २९० ॥

**अर्थ.**—विश्वामित्र व पराशरादिक ऋषि वायु, उदक आणि पर्णें यांचेंच भक्षण करीत असून तेहि स्त्रियांचें, सुंदर मुख कमल अवलोकन करितांच मोह पावले तेव्हां घृत, दुग्ध, आणि दहीं या सहित उत्तम शाल्योदन जे मानव भक्षण करणारे आहेत त्यांस इंद्रिय निग्रह जर होईल तर सागरांत विंध्याद्रि पर्वत तरेल. **तात्पर्य.**—स्त्रियांवर ज्याचें मन जात नाहीं असा पुरुष विरळा.

पत्रंनैवयदाकरीरविटपेदोषोवसंतस्य किं ॥
नोलूकोप्यवलोकतेयदिदिवासूर्यस्यकिंदूषणम् ॥
धारानैवपतंतिचातकमुखेमेघस्यकिंदूषणं ॥
यत्पूर्वंविधिनाललाटलिखितंतन्मार्जितुंकःक्षमः ॥२९१ ॥

**अर्थ.**—करीर (नेवती) वृक्षास पत्रें येत नाहींत हा वसंताचा काय दोष, घुबडास जर दिवसा दिसत नाहीं तर सूर्यातें काय दुषण, मेघाच्या धारा चातक पक्षाच्या मुखांत पडत नाहींत तर मेघास काय दुषण, नव्हे तर जें पूर्वी आपल्या ललाटीं ब्रह्मदेवानें लिहिलें तें अन्यथा करावयास कोण समर्थ आहे? कोणीच नाहीं, जें कर्म केलें तें अवश्य भोगणें आपणास पडतें. **तात्पर्य.**—जें प्राप्त होणें तें आपल्या कर्मानुरूपच होतें या करितां दुसऱ्यास दोष देऊं नये.

**दाक्षिण्यंस्वजनेदयापरजनेशाठ्यंसदादुर्जने ॥**
**प्रीतिःसाधुजनेस्मयःखलजनेविद्वज्जनेचार्जवम् ॥**
**शौर्यंशत्रुजनेक्षमागुरुजनेनारीजनेधूर्तता ॥**
**इत्थंयेपुरुषाःकलासुकुशलास्तेष्वेवलोकस्थितिः ॥२९२॥**

**अर्थ**—स्वकीय जनाचे ठायीं दक्षपणा, परजनीं दया, दुर्जनाचे ठायीं शठपणा, साधूजनाचे ठायीं प्रीति, खलजनाचे ठायीं गर्व, विद्वज्जनाचे ठायीं अवक्रता, शत्रुचे ठायीं शौर्य, गुरूचे ठायीं सहनता धरणें, स्त्रियांचे ठायीं धुर्तपणा ठेवणें या प्रकारें करून जे पुरुष दक्षता ठेवितात ते या जगांत उत्तम स्थितिप्रत पावतात. **तात्पर्य.**—जशास तसें वर्तन ठेवणाऱ्या पुरुषास उत्तम स्थिति प्राप्त होते.

**मित्रंस्वच्छतयारिपुंनयबलैर्लुब्धंधनैरीश्वरं ॥**
**भक्त्याचद्विजआदरेणयुवतिंप्रेम्णाशमैर्बांधवान् ॥**
**आत्युग्रंस्तुतिभिर्गुरुंप्रणतिभिर्मूर्खंकथाभिर्बुधं ॥**
**विद्याभिर्रसिकंरसेनसकलंशीलेनकुर्याद्वशं ॥ २९३ ॥**

**अर्थ.**—मित्राला निष्कपटी मनानें, शत्रुला नीतीनें, कृपणाला धनानें, ईश्वराला भक्तीनें, ब्राह्मणाला बहु मानानें, स्त्रीला प्रीतीनें, आप्ताला क्षमेनें, दुष्टाला स्तुतीनें, थोराला नम्रतेनें, मूर्खाला गोष्टी इत्यादिकानें, ज्ञात्याला विद्येनें, रसिकाला रसिकपणानें आणि सर्व लोकांला सुस्वभावानें वश करावें. **तात्पर्य.**—जें ज्याचें प्रिय तें त्यास दिल्यानें तात्काळ वश होतात.

आयुर्वर्षशतंनृणांपरिमितंरात्रौतदर्धंगतं ॥
तस्यार्धस्यपरस्यचार्धमपरंबालत्ववृद्धत्वयोः ॥
शेषंव्याधिवियोगदुःखसहितंसेवादिभिर्नीयते ॥
जीवेवारितरंगचंचलतरेसौख्यंकुतःप्राणिनां ॥ २१४ ॥

**अर्थ**—मनुष्याचें आयुष्य शतवर्ष परिमितच असून त्यांतील अर्धे आयुष्य रात्रीं निद्रेंत जातें. शेष अर्धांतील अर्धे आयुष्य बालत्व व वृद्धत्व यांत जातें. तसेंच यांतून शेष राहिलेलें आयुष्य, व्याधि, वियोग व दुःख यांनीं युक्त असून तें इतरांच्या सेवादिकार्यांत जातें; आणि जीवाची स्थिति तर जलावरील लाटा सारखी अत्यंत चंचल आहे अशा संसारांत प्राण्यास सौख्य कोठून होणार? तात्पर्य.—आयुष्य शंभर वर्षेंहि असून प्राण्यास सुख होण्यास कांहींच वेळ सांपडत नाहीं.

क्षांतिश्चेद्वचनेनकिंकिमरिभिःक्रोधोस्तिचेद्देहिनां ॥
ज्ञातिश्चेदनलेनकिंयदिसुहृद्दिव्यौषधैःकिंफलं ॥
किंसर्पैर्यदिदुर्जनाःकिमुधनैर्विद्यानवद्यायदि ॥
व्रीडाचेत्किमुभूषणैःसुकवितायद्यस्तिराज्येनकिं॥२१५॥

**अर्थ**.—आंगीं जर क्षमा असली तर दुसऱ्याच्या शांतिकारक वचनें करून काय होणार? मनुष्यास जर क्रोध आहे तर त्यास शत्रू जास्त काय करणार, दाईजापेक्षां अग्नि अधिक नाहीं, मित्रापेक्षां दिव्य औषधी अधिक नाहीं, दुर्जनापेक्षां सर्प अधिक नाहीं, जर उत्तम विद्या आहे तर धन अधिक नाहीं, लज्जेपेक्षां अलंकार अधिक नव्हेत, आणि उत्तम कवित्व जर आहे तर त्याहून राज्य अधिक नाहीं. तात्पर्य.—सुख दुःख प्राप्त होणें हें स्वआचरणाचेंच फळ होय.

दौर्मंत्र्यान्नृपतिर्विनश्यतियतिःसंगात्सुतोलालना ॥
द्विप्रोनध्ययनात्कुलंकुतनयाच्छीलंखलोपासनात् ॥
न्हीर्मद्यादनवेक्षणादपिकृषिःस्नेहःप्रवासाश्रया ॥
मैत्रीचाप्रणयात्समृद्धिरनयात्त्यागात्प्रमादाद्धनम् ॥२१६॥

अर्थ.—वाईट प्रधानाच्या योगेंकरून राजा बुडतो, साधू, सन्यासी इत्यादि संगेंकरून, मुलगा लाड लावल्यानें, ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य हे अध्ययन न केल्यानें, कुळ कुपुत्र उत्पन्न झाल्यानें, स्वभाव नीचाच्या चाकरीनें, लज्जा मद्यानें, शेत चौकशी न केल्यानें स्नेहप्रवासास गेल्यानें, मैत्री ममता न केल्यानें, भाग्य उर्मटपणानें आणि धन अधर्मानें अथवा मूर्खपणा इत्यादिकें करून या प्रकारें या गोष्टी नाशाप्रत पावतात. तात्पर्य.—दुष्ट समागम, आळस, आणि उन्माद हे सर्व नाशकारक होत.

क्षीरेणात्मगतोदकायहिगुणादत्ताःपुरातेखिलाः ॥
क्षीरेतापमवेक्ष्यतेनपयसात्यात्माकृशानौहुतः ॥
गंतुंपावकमुन्मनस्तदभवद्दृष्ट्वातुमित्रापदं ॥
युक्तंतेनजलेनशाम्यतिसतांमैत्रीपुनस्त्वीदृशी ॥ २९७ ॥

अर्थ.—दूध आपल्यामध्यें पाणी येतांच पहिल्यानें त्याला आपले सगळे गुण देतें मग दुधावर अग्नीचा ताप होतांच त्यातें पाहून तें दुग्धरूप झालेलें पाणी जें त्याणें आपलें शरीर अग्नीवर जाळून टाकिलें तेव्हां मित्राचे हाल पाहून दुग्ध अग्नींत उडी घालण्याकरितां उत्सुक होऊन ओतूं येतें मग पुनः पाण्याशीं मिळालें असतां शांत होतें; तस्मात् सज्जनाची मैत्री अशी असते. तात्पर्य.—सज्जनास मित्रापेक्षां प्राण अधिक नाहीं.

स्रग्धरा. ( ७ वे १४ वे आणि २१ वे अक्षरांतीं थांबावें.)

तावद्विद्याऽनवद्यागुणगणमहिमारूपसंपत्तिशौर्यं ॥
स्वस्थानेसर्वशोभापरगुणकथनेवाक्पटुस्तावदेव ॥
यावत्पाकाकुलाभिःस्वगृहयुवतिभिःप्रेषितापत्यवक्त्रा ॥
द्धेतातानास्तितैलंनचलवणमपीत्यादिवाचांप्रचारः॥२९८॥

अर्थ.—तोंपर्यंत निर्दोष विद्या, गुण समुदायाचें महात्म्यरूप, संपत्ति, शौर्य, स्वस्थानीं सर्व शोभा, परगुण वर्णनाविषयीं वाक्चातुर्य हे सर्व प्रकार चालतात. कोठपर्यंत? जोंपर्यंत पाक करण्याविषयीं व्याकूळ झालेल्या स्वगृहांतील तरुण स्त्रियांनीं पाठविलेल्या मुलांच्या तोंडांतून हे बाबा, तेल

नाहीं व मीठहि नाहीं इत्यादि याणीचा संचार नाहीं. तात्पर्य.—जोंपर्यंत घरांत सर्व अनुकूळ आहे तोंपर्यंत मनुष्यास सर्व गोष्टी सुचतात.

सन्मार्गेतावदास्तेप्रभवतिचनरस्तावदेवेंद्रियाणां ॥
लज्जांतावद्विधत्तेविनयमपिसमालंबतेतावदेव ॥
भ्रूचापाकृष्टमुक्ताःश्रवणपथगतानीलपक्ष्माणएते ॥
यावल्लीलावतीनांनहृदिधृतिमुषोदृष्टिबाणाःपतंति ॥ २९९॥

**अर्थ.**—तोंपर्यंतच पुरुष साधूंच्या मार्गीं असतो, आणि इंद्रियांस जिंकणाराहि तोंपर्यंत होतो, लज्जेतेंहि तोंपर्यंतच धरितो आणि लीनतेसहि तोंपर्यंतच आश्रय करितो. जोंपर्यंत भृकुटीरूप धनुष्यानें आकर्षण करून सोडलेले आणि कर्णपर्यंत दीर्घ गेलेले नीलवर्ण पिसाऱ्यांनींयुक्त आणि धैर्यासहि हरण करणारे असे हे विलासवती स्त्रियांचे दृष्टिरूप बाण पडत नाहींत. तात्पर्य.—स्त्रियांच्या कटाक्ष बाणांनीं सदाचरणाचा भंग होतो.

आर्या.

गुणवंतःक्लिश्यंतेप्रायेणभवंतिनिर्गुणाःसुखिनः ॥
बंधनमायांतिशुकायथेष्टसंचारिणःकाकाः ॥ ३०० ॥

**अर्थ.**—गुणिजन क्लेश पावतात, आणि गुणहीन प्रायः सुखी असतात. यास दृष्टांत, राघु बंधन पावतात, आणि काक पक्षी यथेष्ट संचार करतात. तात्पर्य.—गुणिजनास मानसिक वगैरे श्रम व काळजी या पासून जसे क्लेश होतात तसे मूर्खजनास होत नाहीं.

प्राप्यचलानधिकारानशत्रुषुमित्रेषुबंधुवर्गेषु ॥
नापकृतंनोपकृतंनसत्कृतंकिंकृतंतेन ॥ ३०१ ॥

**अर्थ.**—मोठा अधिकार प्राप्त झाला असतां, शत्रु, मित्र व बंधुवर्ग यांचे ठायीं अनुक्रमें अपकार, उपकार, व सत्कार्य न केलीं तर तो अधिकार मिळून उपयोग काय ? तात्पर्य.—ज्याचें त्याचें योग्यतेनुरूप समाचार न घेतल्यास वैभव व्यर्थ जाणावें.

मूर्खोपिनद्रष्टव्याद्रष्टव्याश्चेन्नतैश्चसहतिष्ठेत् ॥
यदितिष्ठेन्नतुकथयेद्यदिकथयेन्मूर्खवत्कथयेत् ॥ ३०२ ॥

**अर्थ.**—मूर्ख मनुष्याचें दर्शन घेऊं नये, कदाचित् दर्शन झालेंच तर त्याच्याजवळ उभें राहूं नये, उभें राहण्याचा प्रसंग आला तर भाषण करूं नये, भाषण करण्याचाहि प्रसंग आलाच तर शेवटीं त्याच्या सारखेंच बोलावें कारण त्याठिकाणीं विद्वानाचें पांडित्य आरण्य रोदनाप्रमाणें निष्फळ होय. **तात्पर्य.**—मुर्खाच्या तोंडीं लागूं नये.

अज्ञःसुखमाराध्यःसुखतरमाराध्यतेविशेसज्ञः ॥
ज्ञानलवदुर्विदग्धंब्रह्मापितंनरंनरंजयति ॥ ३०३ ॥

**अर्थ.**—अज्ञानाचें समाधान सुखानें सहज होतें आणि पुऱ्या जाणत्याचें तर फारच सहज होतें परंतु धड अज्ञान नव्हे आणि धड पुरा जाणता नव्हे असा जो थोड्या ज्ञानानें होरपळलेला त्याचें समाधान ब्रह्म देवाच्यानेंहि होत नाहीं. **तात्पर्य.**—अर्धवट ज्ञान कांहींच उपयोगाचें नाहीं.

दारिद्र्यान्मरणाद्वामरणंसंरोचतेनदारिद्र्यं ॥
अल्पक्लेशंमरणंदारिद्र्यमनंतकंदुःखं ॥ ३०४ ॥

**अर्थ.**—दरिद्रता किंवा मरण यांतून मला मरण उत्तम रुचतें, परंतु दरिद्रता रुचत नाहीं कारण मरणांत क्लेश अल्प होतात आणि दारिद्र्यांत अपार दुःख आहे. **तात्पर्य.**—दरिद्रपणा हा मोठा दुःखकारक आहे.

केचित्स्वभावलुब्धास्तीव्रतरांयातनामपिसहते ॥
नतुसंत्यजंतिवित्तंमात्सर्यमिवाधमाःसततं ॥ ३०५ ॥

**अर्थ.**—कोणी स्वभावसिद्ध लोभी अत्यंत तीक्ष्ण पीडाहि सहन करितात परंतु ते द्रव्याला सोडीत नाहींत. यास दृष्टांत. दुर्जन निरंतर मत्सराचा त्याग करित नाहींत. **तात्पर्य.**—द्रव्यलोभी द्रव्याकरितां प्राण देखील देतील मग इतर सहासकर्में करितील यांत संशय नाहीं.

आशायायेदासास्तेदासाःसर्वलोकस्य ॥
आशायेषांदासीतेषांदासायतेविश्वं ॥ ३०६ ॥

**अर्थ.**—जे आशेचे दास ते सर्व लोकांचे दास होतात आणि आशा

ज्यांची दासी त्यांस सकळ विश्व दासा समान होतें. तात्पर्य.—सर्व सुख दुःखाचें कारण आशा जाणावी या करितां तिचा त्याग करील तो अजिंक्य होय.

**शरदिनवर्षतिगर्जतिवर्षतिवर्षासुनिःस्वनोमेघः ॥**
**नीचोवदतिनकुरुतेवदतिनसाधुःकरोत्येव ॥ ३०७ ॥**

अर्थ.—जसा शरदृतूंतील मेघ केवळ गर्जना मात्र करीत असून पर्जन्य वृष्टि करीत नाहीं आणि वर्षाऋतूंतला मेघ किमपि शब्द न करितां वृष्टि करितो तद्वतच जो नीच असतो तो केवळ वाचालतेनें भाषण मात्र करितो, परंतु कार्य करित नाहीं; आणि जो साधु असतो तो वृथा भाषण न करितां कार्य करितो. तात्पर्य.—जे खरें काम करणारे असतात ते बोलून दाखवित नाहींत.

**अव्यवसायिनमलसंदैवपरंसाहसाच्चपरिहीनं ॥**
**प्रमदापतिमिववृद्धंनेच्छतिलक्ष्मीरुपस्थातुं ॥ ३०८ ॥**

अर्थ.—निरुद्योगी, आलस्ययुक्त, केवळ दैवावरच स्वस्थ बसणारा असल्यामुळें कोणत्याहि साहस करण्याविषयीं विमुख अशा पुरुषासमीप लक्ष्मी प्राप्त होण्याविषयीं इच्छीत नाहीं. यास दृष्टांत असा कीं तरुण स्त्री वृद्ध पतीस इच्छीत नाहीं. तात्पर्य.—निरुद्योगी, आळशी व दैवावर अवलंबून राहणारे पुरुष दरिद्री असतात.

**स्त्रीणांहिसाहचर्याद्भवंतिचेतांसिभर्तुसदृशानि ॥**
**मधुरापिहिमूर्छयतेविषविटपिसमाश्रितावल्ली ॥ ३०९ ॥**

अर्थ.—स्त्रिया सद्गुणी असल्या तथापि पतीच्या सहवासानें त्यांचीं अंतःकरणें पतीसारखीं होतात. एखादि वल्ली मधुर असली तथापि विष वृक्षाच्या आश्रयानें तिच्या आंगीं मादक शक्ति येते. तात्पर्य.—स्त्रियांस सद्गुण अथवा दुर्गुण लागणें हें बहुतकरून पतीच्या आचरणावर अवलंबून असतें.

**अप्रतिबुद्धश्रोतरीवक्तुर्वाक्यंप्रयातिवैफल्यं ॥**
**नयनविहीनेभर्तरिलावण्यमिवेहखंजनाक्षीणां ॥ ३१० ॥**

**अर्थ.**—पती अंध असल्यानें मृगनयना ज्या तरुण स्त्रिया सौंदर्य जसें फुकट जातें, तद्वत मूर्ख श्रोत्यांशीं गांठ पडली वक्त्याच्या पांडित्याचीं दशा होते. **तात्पर्य.**—ज्याला ज्या वस्तु नाहीं त्यास तें व्यर्थ होय.

**आलस्यंस्त्रीसेवासरोगताजन्मभूमिवात्सल्यं ॥**
**संतोषोभीरुत्वंषड्व्याघातामहत्वस्य ॥ ३११ ॥**

**अर्थ.**—आळस, स्त्रीसेवा, रोगयुक्तत्व, जन्मभूमीचा त्याग न संतोष व भित्रेपणा हे सहा दोष महत्व प्राप्त होण्यास प्रतिबंधक हेत. **तात्पर्य.**—विपरीत चिन्हें महत्व प्रतिबंधक होत.

**तावन्महतांमहतीयावत्किमपिहिनयाच्यतेलोकं ॥**
**बलिमनुयाचनसमयेश्रीपतिरपिवामनोजातः ॥ ३१२**

**अर्थ.**—जोंपर्यंत लोकांस किमपि याचना करीत नाहींत तों श्रेष्ठांचें महत्व राहतें यास दृष्टांत विष्णुनें ज्या कालीं बलीस केली त्यासमयीं तो लक्ष्मीपति असूनहि त्यास आकृतीनें ऱ्हस्व त्यापुढें हात पसरून लघुत्व स्वीकारणें प्राप्त झालें. **तात्पर्य.**—ज कोणास कांहीं मागण्याचा प्रसंग येत नाहीं तोंपर्यंतच त्याचें महत्व

**दातव्यंभोक्तव्यंसतिविभवेसंचयोनकर्तव्यः ॥**
**पश्येहमधुकरीणांसंचितमर्थंहरंत्यन्ये ॥ ३१३ ॥**

**अर्थ.**—आपणास वैभव अनुकूल असलें तर दान, व भोग या प्रकारांनीं त्याचा विनियोग करावा; परंतु संचय न करावा. यास मधुमक्षिकांनीं प्रत्येक पुष्पांतून संपादन करून एकत्र संचित करून लेल्या मधरूप पदार्थास जसे अन्य लोकच हरण करितात तद्वतच त्तीची अवस्था जाणावी. **तात्पर्य.**—संपत्ति प्राप्त झाली असतां स करीत असावा.

**दानंभोगोनाशस्तिस्रोगतयोभवंतिवित्तस्य ॥**
**योनददातिनभुंक्तेतस्यतृतीयागतिर्भवति ॥ ३१४ ॥**

**अर्थ.**—दान, भोग आणि नाश या तीन गति द्रव्याच्या होतात, तेव्हां जो देत नाहीं आणि भोगितीह नाहीं त्याच्या द्रव्याची तिसरी वाट होते. **तात्पर्य.**—संपत्तीचा भोग न घेतां व्यर्थ जाऊं देऊं नये.

## सुज्ञांस प्रार्थना.

स्वल्पामाजि सुबोध अज्ञमनुजां व्हाया सजीं संस्कृत ॥
पद्यें उत्तम थोर थोर कविचीं अर्था सह प्राकृत ॥
तीं गुंफोनि "सुबोधसार" रचिला हा रंगनाथें श्रमें ॥
ज्यांची या पठणें मुळीं उरू नये अज्ञानरूपी तमें ॥१॥
सूज्ञ रसिकजनयातें, प्रार्थुनियां मागतों क्षमा दात्यां ॥
हंसक्षीर न्यायें, घ्यावा रस टाकुनी प्रमादांत्या ॥ २ ॥

### भाग पहिला

समाप्त.